


## विधानें

(१) बुद्धीचा मना । जीवना–वर परिणाम होतो.

(२) कष्टाच्या कामाची । किंमतीची मागणी का करु नय ?

(३) वायकोला स्वतःपुढें नवऱ्याचें । इतरांचे भान नसते बरे.

(४) पोट । दुःख साऱ्यांच्याच पाठीमागे आहे, पण कर्तव्य करायला पाहिजे !

(५) स्त्री-पुरुषांच्या सहवासांत। संसारांत काहीं सुख नसतें बरें.

(६) लबाडी । मस्करी करण्याच्या भरात मनुष्याच्या मनाचा तोल सुटून कोठपर्यंत जाईल, हें सांगवत नाहीं.

(७) जीवनांत संगतीपेक्षां विसंगतीचेंच रण । रान माजलेलें आढळतें.

(८) पैसा नसला कीं पोटांत तुटतें आणि पैसा वापरला । मिळाला तर पोट फुगतें.

(९) जितकी जाणीव । उणीव जास्त तितकें दुःख अधिक !

(१०) यश । नियति ईश्वरेच्छेवर अवलंबन आहे.

(११) सुवर्णाच्या । सुखाच्या, काळांत मनुष्य अहंकारानें, उन्मत्तपणानें वागतो.

(१२) बायकोला फार सत्यकथन। ताडण करुं नय. थोडेसें करावे.

(१३) विचारी । विलराळ । कन–
बाळांनी दयपरत्वे यतीच म्हणा

अखरची तार...

अधिकृत उत्तर :...

शब्दरंजन स्पर्धा क्र. ...
प्रवेश--फी प्रत्येक चौक...

.... प्रवे...

| | | | |
|---|---|---|---|
| १. | मना- | जीवना- | |
| 2 | कामाची | किंमतीची | |
| 3 | नवऱ्याचे | इतरांचे | |
| ४ | पोट | दुःख | |
| ५ | सहवासांत | संसारांत | |
| ६ | लबाडी | मस्करी | |
| ७ | रण | रान | |
| ८ | वापरला | मिळाला | |
| ९ | जाणीव | उणीव | |
| १० | यश | नियति | |
| ११ | सुवर्णाच्या | सुखाच्या | |
| १२ | सत्यकथन | ताडण | |
| १३ | विचारी | [illegible] | [illegible] |
| १४ | राग | [illegible] | [illegible] |
| १५ | [illegible] | [illegible] | [illegible] |
| १६ | [illegible] | [illegible] | [illegible] |

हा स्पर्धेत भाग...
अटी मला मान्य असून...
अखेरचा निर्णय मी मान्...

... २०४ ...
... पुणे ...



### सांप्रदायिक ज्ञानेश्वरी शिक्षण माला पुस्तक २ रें

## सान्वय व सार्थ

# श्रीज्ञानेश्वरी अध्याय बारावा

जयजय वो शुद्धे । उदारे प्रसिद्धे ।
अनवरत आनंदे । वर्षतिये ॥ १ ॥

**अन्वय**——वो (गुरुकृपादृष्टी) शुद्धे, प्रसिद्धे उदारे, अनवरत आनंदें वर्षतिये[1], (तूं) जयजय[2].

**अर्थ**——हे (श्रीगुरुकृपादृष्टिमाउली) निर्मळ, प्रख्यात उदार, (व) अखंड आनंदाचा (शब्दशः——आनंदानें) वर्षाव[1] करणाऱ्या[1] (अशा तुझा) जयजयकार[2] असो.[2]

विषयव्यालें मिठी । दिधलिया नुठी ताठी ।
तें तुझेनि गुरुकृपादृष्टी । निर्विष होय ॥२॥

**अन्वय**——(हे) गुरुकृपादृष्टी, विषयव्यालें[1] मिठी दिधलिया[2] ताठी नुठी[3], ते (मिठी) तुझेनि निर्विष होय.

**अर्थ**——(हे) श्रीगुरुकृपादृष्टिमाउली, विषयरूपी[1] सर्पानें[1] दंश केला[2] असतांना[2] (येणारी) मूर्च्छा नाहींशी[3] होत[3] नाही[3]; तो (मूर्च्छा आणणारा दंश) तुझ्यामुळें विषरहित होतो.

तरि कवणातें तापु पोळी । कैसेनि वो शोकु जाळी ।
जरि प्रसादरसकल्लोळीं । पूरें येसि तूं ॥३॥

**अन्वय**—वो, जरी तूं प्रसादरसकल्लोळीं[1] पुरें येसि, तरि कवणातें तापु पोळी ! शोकु कैसेनि जाळी !

**अर्थ**—हे ( गुरुकृपादृष्टी ), जर तूं अनुग्रहरूपी[1] पाण्याच्या[1] लाटांनीं[1] ( युक्त अशा ) पुरानें येशील ( शब्दशः–येतेस ), तर कोणाला ताप पोळील ( शब्दशः–पोळतो ) ! ( आणि ) शोक कसा जाळील ( शब्दशः–जाळतो ) ! ( म्ह० तुझा अनुग्रह ज्याच्यावर होईल त्याला त्रिविधं ताप व शोक बाधूं शकणार नाहींत ).

योगसुखाचे सोहळे । सेवकां तुझेनि स्नेहाळे ।
सोहंसिद्धीचे लळे । पाळिसी तूं ॥४॥

**अन्वय**—( हे ) स्नेहाळे, तुझेनि सेवकां योगसुखाचे[1] सोहळे, तूं सोहंसिद्धीचे[2] लळे पाळिसी.

**अर्थ**—( हे ) प्रेमळे, तुझ्यामुळें भक्तांना अष्टांगयोगाच्या[1] सुखाचे[1] उपभोग ( प्राप्त होतात ); तूं–' तें ब्रह्म[2] मी आहे–' ह्या[2] अनुभवाचे[2] ( भक्तांचे ) लाड पुरवितेस. ( म्ह० तुझ्यामुळें भक्तांना समाधिसुख व ब्रह्मानुभव प्राप्त होतो ).

आधारशक्तीचिया अंकीं । वाढविसी कौतुकीं ।
हृदयाकाशपल्लकीं । परिये देसी निजे ॥५॥

**अन्वय**—आधारशक्तीचिया[1] अंकीं ( तूं ) कौतुकीं वाढविसी, हृदयाकाशपल्लकीं[2] निजे परिये देसी.

**अर्थ**—मूलाधारचक्रावर[1] अधिष्ठित[1] असलेल्या[1] कुंडलिनीच्या[1] मांडीवर ( तूं ) प्रेमानें ( साधकास ) वाढवितेस ( व ) हृदयाकाशरूपी[2] पाळण्यांत[2] ( घालून ) झोंपेसाठीं झोके देतेस.

प्रत्यक्ज्योतीची वोवाळणी । करिसी मनपवनांचीं खेळणीं ।
आत्मसुखाचीं बाळलेणीं । लेवविसी ॥६॥

**अन्वय**—( तूं ) प्रत्यक्ज्योतीची वोवाळणी करिसी, मनपवनांचीं[1] खेळणीं ( करिसी ) ( व ) आत्मसुखाचीं बाळलेणीं[2] लेवविसी.

**अर्थ**—( तूं साधकरूपी बालकास ) आत्मज्योतीची ओवाळणी करितेस ( म्ह० आत्मज्योतीच्या निरांजनानें ओवाळतेस ); मनाचीं[1] व[1] प्राणाचीं[1]

खेळणीं ( देतेस ) ( व ) स्वरूपानंदरूपी ल्हान[२] मुलाचे[२] दागिने[२] ( अंगावर ) चढवितेस ( घालितेस ).

सतरावियेचें स्तन्य देसी । अनुहताचा हल्लरु गासी ।
समाधिबोधें निजविसी । बुझाऊनि ॥७॥

अन्वय--( तूं ) सतरावियेचें स्तन्य देसी, अनुहताचा हल्लरु गासी, समाधिबोधें[१] बुझाऊनि[२] निजविसी.

अर्थ--( तूं साधकांना ) जीवनकलेचें ( अंगावरलें ) दूध ( म्ह० स्तनपान ) देतेस, अनाहतध्वनीचें अंगाईगीत गातेस ( व ) समाधीच्या[१] बोधानें[१] समजूत[२] घालून[२] ( म्ह० तो अनुभवास आणून देऊन ) ( त्यांना ) ( आत्मस्वरूपीं ) झोंपवितेस.

म्हणोनि साधकां तूं माउली । पिके सारस्वत तुझिया पाउलीं ।
या कारणें मी साउली । न संडीं तुझी ॥८॥

अन्वय–म्हणोनि साधकां तूं माउली, सारस्वत[१] तुझिया पाऊलीं[२] पिके[२], या[३] कारणें[३] तुझी साउली मी न संडीं.

अर्थ–म्हणून साधकांची तूं आई ( आहेस ), सर्व[१] विद्या[१] तुझ्या चरणमुद्रेच्या[२] ठिकाणीं[२] उत्पन्न[३] होतात;[३] एवढ्याकरितां[३] तुझें सान्निध्य मी सोडीत नाहीं.

अहो सद्‌गुरूचिये कृपादृष्टी । तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी ।
तो सकळ-विद्यांचिये सृष्टी । धात्रा होय ॥९॥

अन्वय–अहो सद्‌गुरूचिये कृपादृष्टी, तुझें कारुण्य जयातें अधिष्ठी, तो सकळ विद्यांचिये सृष्टी धात्रा होय.

अर्थ–हे सद्‌गुरूचे कृपादृष्टे, तुझी कृपा ज्याच्यावर वसते, तो सर्व विद्यारूपी सृष्टीचा ( उत्पादक ) ब्रह्मदेव होतो [ म्ह० तो सर्व विद्यांच्या निर्मितीच्या ( बाबतींत ) प्रतिब्रह्मदेवच बनतो. ]

म्हणोनि अंबे श्रीमंते । निजजनकल्पलते ।
आज्ञापीं मातें । ग्रंथनिरूपणीं ॥१०॥

अन्वय–म्हणोनि निजजनकल्पलते[१], श्रीमंते, अंबे, ग्रंथनिरूपणीं[२] मातें आज्ञापीं[२],

**अर्थ**—म्हणून आपल्या[1] भक्तांची[1] ( इच्छा पुरविणारी ) कल्पलता[1] वैभवसंपन्न ( अशा ) माते, ग्रंथाचें[2] व्याख्यान[2] करण्याच्या[2] बाबतींत[2] मला अनुज्ञा[3] दे[3].

> नवरसीं भरवीं सागर । करवीं उचित रत्नांचे आगर ।
> भावार्थाचे गिरिवर । निफजवीं माये ॥ ११ ॥

**अन्वय**—( हे ) माये, नवरसीं सागर भरवीं[1], उचित रत्नांचे आगर करवीं[2], भावार्थाचे गिरिवर[3] निफजवीं[3].

**अर्थ**—( हे ) आई, ( मला या ग्रंथानिरूपणांत ) नवरसांचे सागर भरविण्यास[1] समर्थ[1] कर[1]; योग्य शब्दरत्नांच्या खाणी ( मजकडून ) तयार[2] करीव[2] ( व ) तात्पर्यार्थांचे मोठाले[3] पर्वत[3] निर्माण[3] करीव[3].

> साहित्यसोनियाचिया खाणी । उघडवीं देशियेचिया क्षोणी ।
> विवेकवेलीची लावणी । हों देईं सैंघ ॥ १२ ॥

**अन्वय**—देशियेचिया क्षोणीं साहित्यसोनियाचिया[1] खाणी उघडवीं[2], विवेकवेलीची लावणी सैंघ हों देईं.

**अर्थ**—मराठीभाषारूपी भूमीमध्यें अलंकारशास्त्ररूपी[1] सोन्याच्या[1] खाणी खोदण्यास[2] ( मला ) समर्थ[2] कर[2] ( आणि ) विचाररूपी[3] लतेची[3] लागवड पुष्कळ होऊं दे.

> संवादफळनिधानें । प्रमेयांचीं उद्यानें ।
> लावीं म्हणे गहनें । निरंतर ॥ १३ ॥

**अन्वय**—संवादफळनिधानें प्रमेयाचीं गहनें उद्यानें निरंतर लावीं, म्हणें.

**अर्थ**—प्रश्नोत्तरचर्चारूपी[1] फळांनीं[1] भरलेलीं[1] सिद्धांतांचीं ( म्ह० सिद्धान्तरूपी झाडांचीं ) दाट उपवनें एकसारखीं लाव, ( असें मी ) म्हणतों ( म्ह० विनंती करतों ).

> पाखांडाचे दरकुटे । मोडीं वाग्वाद-अव्हांटे ।
> कुतर्कांचीं दुष्टें । सावजें फेडीं ॥ १४ ॥

**अन्वय**—पाखांडाचे दरकुटे, वाग्वादअव्हांटे[1] मोडीं[2]; कुतर्कांचीं दुष्टें सावजें फेडीं[3].

**अर्थ**—नास्तिकमतरूपी दऱ्या ( आणि ) वितंडवादरूपी[1] आडवाटा[1]

( अर्थात् आडमार्गांतील लपावयाच्या जागा ) मोडून[२] टाक[२] ( म्ह० नष्ट कर ), ( व अशा रीतीनें ) तर्कटरूपी हिंस्र श्वापदें हुसकून[३] लाव[३].

श्रीकृष्णगुणीं मातें । सर्वत्र करीं वो सरतें ।
राणिवे बैसवीं श्रोते । श्रवणाचिये ॥१५॥

**अन्वय**–वो ( गुरुकृपादृष्टी ) श्रीकृष्णगुणीं[१] मातें सर्वत्र[२] सरतें करीं श्रोते श्रवणाचिये राणिवे बैसवीं.

**अर्थ**–हे ( गुरुकृपादृष्टे ) श्रीकृष्णगुणांच्या[१] वर्णनांत[१] मला सर्व[२] प्रकारें[२] ( अर्थात् पूर्णपणें ) समर्थ कर; ( आणि ) श्रोत्यांना श्रवणाच्या ( श्रवण सुखाच्या ) राज्यावर बसव.

ये म-हाठियेचिया नगरीं । ब्रह्मविद्येचा सुकाळु करीं ।
घेणें देणें सुखचिवरी । हों देईं या जगा ॥१६॥

**अन्वय**–ये म-हाठियेचिया[१] नगरीं ब्रह्मविद्येचा सुकाळु करीं, या जगा सुखचिवरी[२] घेणें[३] देणें[३] हों देईं.

**अर्थ**–या मराठी[१] भाषेच्या[१] नगरांत आत्मज्ञानाची समृद्धि कर, या जगांत केवळ[२] सुखानेंच[२] ( अर्थात् सुखाचीच ) देवघेव[३] होऊं दे.

तूं आपुलेनि स्नेहपल्लवें । मातें पांघुरविशील सदैवे ।
तरि आतांचि हें आघवें । निर्मीन माये ॥ १७ ॥

**अन्वय**–( हे ) सदैवे माये, तूं आपुलेनि स्नेहपल्लवें[१] मातें पांघुरविशील[२], तरि हें आघवें आतांचि निर्मीन[३].

**अर्थ**– ( हे ) भाग्यशाली माते ( गुरुकृपादृष्टे ), तूं आपल्या प्रेमरूपी[१] पदराचें[१] ( शब्दश :–पदरानें ) ( जर ) मला पांघरूण[२] घालशील[२], तर हें सर्व ( म्ह० ह्या वरील सर्व गोष्टी ) आतांच ( मी ) उत्पन्न[३] करीन[३].

इये विनवणीयेसाठीं । अवलोकिलें गुरुकृपादृष्टीं ।
म्हणे गीतार्थेंसीं उठीं । न बोलें बहु ॥ १८ ॥

**अन्वय**–इये विनवणीयेसाठीं गुरुकृपादृष्टी अवलोकिलें ( आणि ) म्हणे, गीतार्थेंसीं उठीं[१] बहु न बोलें.

**अर्थ**–या विनंतीबरोबर गुरुकृपादृष्टीनें ( ज्ञानेश्वरांच्याकडे ) पाहिलें ( आणि ) म्हटलें, ' गीतार्थासह ऊठ ( म्ह० गीतार्थ सांगण्यास प्रवृत्त[१] हो[१] );

( आतां ) फार बोलूं नकोस.' ( म्ह० पाल्हाळ करूं नकोस ).

तेथ जी जी महाप्रसादु । म्हणोनि साविया जाहला आनंदु ।
आतां निरोपीन प्रबंधु । अवधान दीजे ॥१९॥

**अन्वय**--तेथ जी जी महाप्रसादु[1], म्हणोनि[2] साविया आनंदु जाहला, आतां प्रबंधु निरोपीन[2] अवधान दीजे.

**अर्थ**--( असें गुरु म्हणाले ) तेव्हां " होय, होय, ( जशी आपली आज्ञा ); ( ही आपली मजवर ) मोठी[1] कृपा[1] ( झाली ) " ( असें ज्ञानेश्वरमहाराज म्हणाले ); अशा[2] प्रकारें[2] ( ज्ञानदेवांना ) सहजच ( मोठा ) आनंद झाला ( व ते म्हणाले ) " आतां ( मी ) ग्रंथाचें व्याख्यान[2] करीन[2] ( आपण ) लक्ष द्यावें. "

अर्जुन उवाच—
एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ।
ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः ॥ १ ॥

तरी सकळवीराधिराजु । जो सोमवंशीं विजयध्वजु ।
तो बोलता जाहला आत्मजु । पांडुनृपाचा ॥२०॥

**अन्वय**--तरी जो सकळवीराधिराजु[1], सोमवंशीं विजयध्वजु[2], पांडुनृपाचा आत्मजु तो बोलता[3] जाहला[3].

**अर्थ**--नंतर जो सर्व[1] वीरांचा[1] मुख्यनायक[1], चंद्रवंशांतील जयाची[2] पताका[2] ( व ) पांडुराजाचा मुलगा तो ( अर्जुन ) म्हणाला[3] ( शब्दशः--बोलणारा झाला ).

कृष्णातें म्हणे अवधारिलें । आपण विश्वरूप मज दाविलें ।
तंव नवल म्हणोनि बिहालें । चित्त माझें ॥२१॥

**अन्वय**--कृष्णातें म्हणे अवधारिलें, आपण विश्वरूप मज दाविलें, तंव ( तें ) नवल म्हणोनि माझें चित्त बिहालें[1].

**अर्थ**--( तो ) कृष्णाला म्हणाला, ऐकलें ( कां ) ? आपण ( जेव्हां ) विश्वरूप मला दाखविलें, तेव्हां (तें) अद्‌भुत म्हणून माझें मन भयभीत[1] झालें[1].

आणि इयें कृष्णमूर्तीची सवें । यालागीं सोय धरिली जीवें ।
तंव नको म्हणोनि देवें । वारिलें मातें ॥ २२ ॥

**अन्वय**——आणि ( मज ) इये कृष्णमूर्तीची सवे ( आहे ) यालागीं ( हिची ) सोय जीवें धरिली, तंव देवें ' नको ' म्हणोनि मातें वारिलें.[1]

**अर्थ**——आणखी ( मला ) ह्या कृष्णमूर्तीची संवय ( आहे ) म्हणून ( हिचा ) आश्रय मनानें इच्छिला, तेव्हां देवांनीं ' नको ' ( असें ) म्हणून मला परावृत्त[1] केलें[1].

तरि व्यक्त आणि अव्यक्त । हें तूंचि एक निभ्रांत ।
भक्ती पाविजे व्यक्त । अव्यक्त योगें ॥ २३ ॥

**अन्वय**——तरि व्यक्त आणि अव्यक्त हें तूंचि एक निभ्रांत ( अससी ), व्यक्त भक्ती पाविजे[1] ( आणि ) अव्यक्त योगें ( पाविजे[2] ).

**अर्थ**——आतां साकार ( सगुण ) व निराकार ( निर्गुण ) ह्या ( दोन्हीं रूपांनीं ) तूंच एक निःसंशय ( आहेस ), सगुण भक्तीनें प्राप्त[1] केलें[1] जातें[1] ( व ) निर्गुण योगानें ( प्राप्त[2] केलें[2] जातें[2] ).

या दोनी जी वाटा । तूतें पावावया वैकुंठा ।
व्यक्ताव्यक्त दारवंठा । रिगिजे येथ ॥ २४ ॥

**अन्वय**——जी वैकुंठा, तूतें पावावया या दोनी वाटा ( असती ) येथ[1] व्यक्ताव्यक्त[2] दारवंठां रिगिजे[3].

**अर्थ**——महाराज श्रीकृष्णा, तुला पोहचण्यासाठीं हे दोन मार्ग ( आहेत ); या[1] ठिकाणीं[1] ( म्ह० या दोन वाटांच्या शेवटीं ) साकार[2] ( म्ह० सगुण ) ( आणि[2] ) निराकार[2] ( म्ह० निर्गुण ) ( ह्यांच्या ) उंबरठ्यांत शिरतां[3] येतें[3] ( शब्दशः —शिरकाव[3] केला[3] जातो.[3] ) [म्ह० भक्ति व योग ह्या दोन मार्गांच्या अंतीं अनुक्रमें सगुणाची व निर्गुणाची प्राप्ति होते. ] [ अथवा वैकल्पिक अर्थ—येथें[1] ( म्ह० वैकुंठांत अर्थात् तुझ्या ठिकाणीं ) साकार—निराकार दरवाज्यांनीं ( म्ह० सगुणनिर्गुणोपासनांच्या द्वारांपैकीं, कोणत्याहि एकानें ) शिरतां येतें. ].

पैं जे वानी स्यातुका । तेंचि वेगळिया वाला येका ।
म्हणोनि एकदेशिया व्यापका । सरिसा पाडु ॥ २५ ॥

**अन्वय**——जे वानी स्यातुका[1] ( असे ) तेचि ( वानी ) वेगळिया येका वाला ( असे ) म्हणोनि एकदेशिया ( आणि ) व्यापका पाडु

सरिसा ( असे ).

**अर्थ**——जो कस शंभर[1] भाराला[1] ( म्ह० शंभर भार सोन्याच्या लगडीचां असतो ) तोंच ( कस ) वेगळ्या एका वालाला ( म्ह० वालभर सोन्याला असतो ); म्हणून अंशव्यापी ( आणि ) सर्वव्यापी ( अशा दोन्ही रूपांची ] योग्यता सारखीच ( ठरते ).

अमृताचिया सागरीं । जे लाभे सामर्थ्याची थोरी ।
तेचि दे अमृतलहरी । चुळीं घेतलिया ॥ २६ ॥

**अन्वय**——अमृताचिया सागरीं जे सामर्थ्याची थोरी लाभे[1], तेचि अमृतलहरी चुळीं घेतलिया दे[2].

**अर्थ**——अमृताच्या समुद्रामध्यें जो प्रभावाचा उत्कर्ष प्राप्त[1] होतो[1] तोच ( उत्कर्ष ) अमृताची लाट[2] चुळींत ( गुळण्यांत ) घेतली[3] असतां[3] देते.

हे कीर माझ्या चित्तीं । प्रतीति आथि जी निरुती ।
परि पुसणें योगपती । तें याचिलागीं ॥ २७ ॥

**अन्वय**——जी योगपती, माझ्या चित्तीं हे कीर प्रतीति निरुती आथि, परि पुसणें तें याचिलागीं.

**अर्थ**——महाराज योगेश्वरा ( श्रीकृष्णा ), माझ्या मनामध्यें हीच खरोखर प्रतीति ( म्ह० अनुभव ) निश्चयेंकरून आहे; परंतु ( माझें ) विचारणें तें अशाचसाठीं ( कीं )——

जें देवा तुम्हीं नावेक । अंगिकारिलें व्यापक ।
तें साचाचि कीं कवतिक । हें जाणावया ॥ २८ ॥

**अन्वय**——देवा, जें व्यापक ( रूप ) तुम्हीं नावेक अंगिकारिलें[1], तें साचचि कीं कवतिक ( होतें ) हें जाणावया.

**अर्थ**——श्रीकृष्णा, जें विश्वव्यापक ( विश्वरूप ) तुम्हीं क्षणभर ( अर्थात् कांहीं काळ ) धारण[1] केलें[1] ( होतें ), तें ( व्यापकरूप ) खरेंच कीं ( नुसता ) चमत्कार ( म्हणून घेतलें होतें ) हें जाणण्यासाठीं ( म्हणून मी आपणांस प्रश्न विचारीत आहें ).

तरि तुजलागीं कर्म । तूंचि जयांचें परम ।
भक्तीसी मनोधर्म । विकोनि घातला ॥ २९ ॥

**अन्वय**–तरि ( जयांचें ) कर्म तुजलागीं ( घडे ), तूंचि जयांचें परम ( होसी ), ( जिहीं ) मनोधर्म[1] भक्तीसी विकोनि घातला.

**अर्थ**–तरि ( ज्यांचें ) कर्म तुझ्याकरितां ( होतें ), तूंच ज्यांचें सर्वोत्कृष्ट ( ध्येय किंवा प्राप्य आहेस), ( आणि ज्यांनीं आपल्या ) मनाचा[1] सर्व[1] व्यापार[1] भक्तीला विकून टाकला ( म्ह० भक्तीच्या स्वाधीन केला ).

> इत्यादि सर्वांपरी । जे भक्त तूतें श्रीहरी ।
> बांधोनियां जिव्हारीं । उपासिती ॥ ३० ॥

**अन्वय**– ( हे ) श्रीहरी, इत्यादि सर्वांपरी[1] जे भक्त तूतें जिव्हारीं बांधोनियां[2] उपासिती.

**अर्थ**– (हे) कृष्णा, इत्यादि सर्व[1] प्रकारांनीं[1] जे भक्त तुला अंतःकरणांत दृढ[2] धरून[2] भजतात.

> आणि जें प्रणवापैलीकडे । वैखरीयेसि जें कानडें ।
> कायिसयाहि सांगडें । नव्हे जें वस्तु ॥ ३१ ॥

**अन्वय**–आणि जें वस्तु प्रणवापैलीकडे[1] ( असे ), वैखरीयेसि[2] जें कानडें ( असें ), ( आणि ) जें कायिसयाहि सांगडें नव्हे.

**अर्थ**–आणि जें ब्रह्म ओंकाराच्या[1] पलीकडे[1] ( आहे ), ( आणि ) व्यावहारिक[2] वाणीला[2] जें दुर्बोध ( म्ह० अगोचर ) ( आहे ), ( आणि ) जी ( ब्रह्मवस्तु ) कशाहि सारखी ( आहे ) ( म्हणून सांगतां येत ) नाहीं.

> तें अक्षर जें अव्यक्त । निर्देशदेशरहित ।
> सोहंभावें उपासित । ज्ञानिये जें ॥ ३२ ॥

**अन्वय**–जी, तें अक्षर, अव्यक्त, निर्देश[1] देशरहित[2] (वस्तु), जे ज्ञानिये[3] सोहंभावें[4] उपासित.

**अर्थ**–हे ( श्रीकृष्णा ), ती अविनाशी, निराकार, जी[1] दाखवितां[1] येत[1] नाहीं[1] (आणि) जिचें[2] स्थान[2] सांगतां[2] येत[2] नाहीं[2] (अशी वस्तु), जे ज्ञानी[3] लोक[3] 'ती[4] (म्ह० ब्रह्मवस्तु) मीच[4] आहें[4], अशा[4] भावनेनें[4] उपासितात.

> तयां आणि जी भक्तां । येरयेरांमाजीं अनंता ।
> कवणें योगु तत्त्वता । जाणितला सांगा ॥ ३३ ॥

**अन्वय**–जी अनंता, तयां आणि भक्तां येरयेरांमाजीं[1] कवणें योगु तत्त्वता

जाणितला[२] सांगा.

**अर्थ**–महाराज श्रीकृष्णा, (असे) ज्ञानी ( शब्दशः – त्यांच्यांत ) आणि भक्त ( शब्दशः – भक्तांत ) या[१] परस्परांत[१] (अर्थात् या दोहोमध्यें) कोणाकडून योग खरोखर जाणिला[२] गेला[२] (तें) सांगा.

> इयां किरीटीचिया बोला । तो जगद्बंधु संतोषला ।
> म्हणे हो प्रश्नु भला । जाणसी करूं ॥ ३४ ॥

**अन्वय**–इया किरीटीचिया बोला तो जगद्बंधु संतोषला[१] म्हणे, हो प्रश्नु करूं[२] भला जाणसी.

**अर्थ**–या अर्जुनाच्या बोलण्यानें तो श्रीकृष्ण संतुष्ट[१] झाला[१] [ आणि ] म्हणाला, " अरे (अर्जुना) प्रश्न[२] कसा[२] करावा[२] (हें तूं) चांगलें जाणतोस "

**श्रीभगवान् उवाच**–

> मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।
> श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥ २ ॥

> तरि अस्तुगिरीचिया उपकंठीं । रिगालिया रविबिंबापाठीं ।
> रश्मी जैसे किरीटी । संचरती ॥ ३५ ॥

**अन्वय**–किरीटी, तरि अस्तुगिरीचिया उपकंठीं रिगालिया रविबिंबापाठीं[१] जैसे रश्मी संचरती.

**अर्थ**–अर्जुना, तरि अस्ताचलाच्या जवळ शिरलेल्या ( म्ह० प्राप्त झालेल्या ) सूर्यबिंबाच्या[१] मागोमाग[१] ज्याप्रमाणें किरणें जातात–

> कां वर्षाकाळीं सरिता । जैसी चढों लागे पांडुसुता ।
> तैसी नीच नवी भजतां । श्रद्धा दिसे ॥ ३६ ॥

**अन्वय**–पांडुसुता, कां जैसी वर्षाकाळीं सरिता चढों लागे, तैसी भजतां[१] श्रद्धा नीच नवी दिसे.

**अर्थ**–अर्जुना, अथवा ज्याप्रमाणें पावसाळ्यांत नदी वाढूं लागते, त्याप्रमाणें ( माझें ) भजन[१] करतांना[१] ( भक्तांची ) श्रद्धा प्रतिदिनीं नवीनवी दिसते.

> परि ठाकिलियाहि सागरु । जैसा मागीलही यावा अनिवारु ।
> तिये गंगेचिये ऐसा पडिभरु । प्रेमभावा ॥ ३७ ॥

**अन्वय**–परि सागरु ठाकिलियाहि मागीलहि[1] यावा, जैसा अनिवारु ( असे ) तिये गंगेचिये ऐसा प्रेमभावा पडिभरु[2] ( असे ).

**अर्थ**–परंतु समुद्राला पोहंचल्यावरसुद्धां ( गंगेचा ) मागून[1] येणारा[1] ( पाण्याचा ) लोंढा, जसा अलोट ( असतो ) ( तसा ) त्या गंगेच्या ( लोंढ्या– ) प्रमाणें ( ज्यांच्या ) प्रेमभावाला अधिक[2] भर[2] ( असतो ).

तैसें सर्वेंद्रियांसहितें । मजमाजीं सूनि चित्तें ।
जे रात्र दिवस न म्हणतें । उपासिती ॥३८॥

**अन्वय**—तैसें सर्वेंद्रियांसहितें[1] मजमाजीं[2] चित्त सूनि जे रात्र दिवस न म्हणत उपासिती[3].

**अर्थ**––त्याप्रमाणें सर्व[1] इंद्रियांसह[1] माझ्या[2] ठिकाणीं[2] मन लावून जे ( भक्त ) रात्र ( आहे कां ) दिवस ( आहे ) न म्हणतां ( म्ह० ह्याचा विचार न करतां ) ( माझी ) उपासना[2] करतात[2].

इयापरी जे भक्त । आपणपें मज देत ।
तेचि मी योगयुक्त । परम मानीं ॥३९॥

**अन्वय**—इयापरी[1] जे भक्त मज आपणपें देत, तेचि परम योगयुक्त मी मानीं.

**अर्थ**––अशा[1] प्रकारें[1] जे भक्त मला आत्मार्पण करतात, तेच श्रेष्ठ योगी ( असें ) मी समजतों.

ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ।
सर्वत्रगमचिन्त्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥३॥
संनियम्येन्द्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः ।
ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रताः ॥४॥

आणि येरें तेही पांडवा । जे आरूढोनि सोहंभावा ।
झोंबती निरवयवा । अक्षरासी ॥४०॥

**अन्वय**–पांडवा, आणि येर तेहि जे सोहंभावा[1] आरूढोनि[2] निरवयवा अक्षरासी झोंबती.

**अर्थ**–अर्जुना, आणि दुसरे तेसुद्धां जे ( योगी ) 'तें ब्रह्म मी आहे' अशा[1] भावनेचा[1] स्वीकार[2] करून[2] अवयवरहित अक्षराला (म्ह० अविनाशी

अशा ब्रह्माला ) बिलगतात.

मनाची नखी न लगे । जेथ बुद्धीची दृष्टी न रिगे ।
इंद्रियां कीर जोगें । कायि होईल ॥४१॥

**अन्वय**—जेथ[१] मनाची नखी न लगे, बुद्धीची दृष्टि न रिगे (तें) कीर इंद्रियां जोगें होईल कायि ?

**अर्थ**—ज्या[१] ठिकाणीं[१] मनाचें नख रुपत नाहीं, बुद्धीची जाणीव शिरत नाहीं; (मग ती वस्तु) खरोखर इंद्रियांना गोचर होईल काय ?

परि ध्यानाही कुवाडें । म्हणौनि एके ठायीं न संपडे ।
व्यक्तीसि माजिवडें । कवणेंही नोहे ॥४२॥

**अन्वय**—परि (तें) ध्यानाही कुवाडें (असें), म्हणोनि एके ठायीं न संपडे, कवणेंही व्यक्तीसि माजिवडें नोहे[१].

**अर्थ**—परंतु (तें) ध्यानालाहि अगम्य असतें; कारण (तें) एका ठिकाणीं सांपडत नाहीं; ( आणि ) कोणत्याहि आविष्कारांत अंतर्गत होत[१] नाहीं[१] ( म्ह० कोणत्याहि प्रकारें चर्मचक्षूस गम्य होत नाहीं. )

जया सर्वत्र सर्वपणें । सर्वांही काळीं असणें ।
जें पावूनि चिंतवणें । हिंपुटी जाहलें ॥४३॥

**अन्वय**—जया सर्वत्र,[१] सर्वांही काळीं सर्वपणें असणें, जें पावूनि[२] चिंतवणें हिंपुटी जाहलें.

**अर्थ**—ज्याचें ( म्ह० ज्या वस्तूचें ) सर्व[१] ठिकाणीं[१], सर्वहिकाळीं सर्वरूपानें अस्तित्व ( असतें ); ज्याचा विचार[२] करूं[२] जातां[२] चिंतनसामर्थ्य (आपल्या असामर्थ्याबद्दल) लज्जित झालें.

जें होय ना नोहें । जें नाहीं ना आहे ।
ऐसें म्हणौनि उपाये । उपजतीचिना ॥४४॥

**अन्वय**—जें होय[१] ना, नोहे[२] ( ना ), जें नाहीं ना[३], आहे ( ना )[४], ऐसें म्हणोनि उपाये उपजतीचिना[५].

**अर्थ**—जें उत्पन्न[१] होत[१] नाहीं ( किंवा ) नाशही[२] पावत[२] ( नाहीं ), जें नाहीं असेंही[३] नाहीं[३] ( व ) आहे ( असेंहि[४] नाहीं[४] ), असें ( आहे ) म्हणून ( त्याला पोहचविणारीं ) साधनें संभवतच[५] नाहींत[५].

जें चळे ना ढळे । सरे ना मैळे ।
तें आपुलेनीचि वळें । आंगविलें जिहीं ॥४५॥

**अन्वय**—जें ढळे ( ना ) चळे ना; सरे ना मैळे ( ना ), तें जिहीं आपुलेनीचि वळें आंगविलें.[1]

**अर्थ**—जें सरतही ( नाहीं ) ( व ) हलतही नाहीं, संपतही नाहीं ( व ) मळतही ( नाहीं ), तें ज्यांनीं आपुल्याच सामर्थ्यानें आत्मसात्[1] ( म्ह० स्वाधीन ) करून[1] घेतलें[1].

पैं वैराग्यमहापावकें । जाळूनि विषयांचीं कटकें ।
अधपलीं तवकें । इंद्रियें धरिलीं ॥४६॥

**अन्वय**—( जिहीं ) वैराग्यमहापावकें[1] विषयांचीं कटकें जाळूनि अधपलीं इंद्रियें तवकें धरिलीं.

**अर्थ**—( ज्यांनीं ) वैराग्यरूप[1] मोठ्या[1] अग्नीनें[1] विषयांचीं सैन्यें जाळून ( टाकून ) होरपळलेलीं इंद्रियें धैर्यानें पकडलीं.

मग संयमाची धाटी । सूनि मुरडिलीं उफराटीं ।
इंद्रियें कोंडिलीं कपाटीं । हृदयाचियां ॥४७॥

**अन्वय**—मग इंद्रियें संयमाची धाटी सूनि उफराटीं मुरडिलीं, हृदयाचिया कपाटीं कोंडिलीं.

**अर्थ**—नंतर इंद्रियांना निग्रहाचा फास घालून ( म्ह० इंद्रियांचा निग्रह करून ) ( तीं ) उलट ( म्ह० मागें ) फिरविलीं ( म्ह० अंतर्मुख केलीं ); ( आणि नंतर ) हृदयाच्या गुहेंत कोंडलीं ( म्ह० दाबून ठेविलीं ).

अपानींचिया कवाडा । लावोनि आसनमुद्रा सुहाडा ।
मूळबंधाचा हुडा । पन्नासिला ॥४८॥

**अन्वय**—( हे ) सुहाडा, अपानींचिया कवाडा आसनमुद्रा[1] लावोनि मूळबंधाचा हुडा पन्नासिला.[2]

**अर्थ**—( हे ) वीरा ( अर्जुना ), अपानवायूच्या मार्गाला ( म्ह० गुदद्वाराला ) आसनरूपी[1] फळी[1] ( किंवा खिटी ) लावून मूळबंधाचा बुरुज सज्ज[2] केला[2].

आशेचे लाग तोडिले । अधैर्याचे कडे झाडिले ।

निद्रेचें शोधिलें । काळवखें ॥४९॥

**अन्वय**–आशेचे लाग तोडिले, अधैर्याचे कडे झाडिले[1] निद्रेचें काळवखें शोधिलें.[2]

**अर्थ**–आशेचे संबंध तोडले, अधैर्याचे कडे साफ[1] केले[1] ( अर्थात् धैर्य दृढ केलें ); झोपेचा अंधार ( म्ह० निद्रेचा अम्मल ) नष्ट[2] केला[2].

वज्राग्नीचिया ज्वाळीं । करूनि सप्तधातूंची होळी ।

व्याधींच्या सिसाळीं । पूजिलीं यंत्रें ॥५०॥

**अन्वय**––वज्राग्नीच्या ज्वाळीं सप्तधातूंची होळी करूनि व्याधींच्या सिसाळीं यंत्रें पूजिलीं.

**अर्थ**––वज्राग्नीच्या ( म्ह० वज्रासनानें उत्पन्न केलेल्या उष्णतेच्या ) ज्वाळांनीं सप्तधातूंचा होम करून रोगांच्या ( म्ह० रोगरूपी पशूंच्या ) मुंडक्यांनीं ( शरीरस्थ मूलाधारादि षट्चक्ररूपी ) तोफा पूजिल्या.

मग कुंडलिनियेचा टेंभा । आधारीं केला उभा ।

तया चोजवलें प्रभा । निमथावरी ॥५१॥

**अन्वय**–मग आधारीं कुंडलिनियेचा टेंभा उभा केला, तया प्रभा निमथावरी चोजविलें.

**अर्थ**–नंतर मूलाधारचक्रावर कुंडलिनीची मशाल उभी केली ( व ) तिच्या प्रकाशाला मस्तकापर्यंत ( ब्रह्मरंध्रापर्यंत ) पोहचविलें.

नवद्वारांचिया चौचकीं । बाणूनि संयतीची आडवंकी ।

उघडली खिडकी । ककारांतींची ॥ ५२ ॥

**अन्वय**–नवद्वारांचिया चौचकीं संयतीची आडवंकी बाणूनि ककारांतींची खिडकी उघडली[1].

**अर्थ**–नवद्वारांच्या ( म्ह० नवद्वारयुक्त शरीराच्या ) चौकांत ( म्ह० मध्यभागांत, नाभिप्रांताच्या आसपास) संयमाचा अडसर घालून सुषुम्ना-नाडीचें मुख उघडण्यांत[1] आलें[1].

प्राणशक्तिचामुंडे । प्रहारूनि संकल्पमेंढे ।
मनोमहिषाचेनि मुंडें । दिधलीं वळी ॥५३॥

अन्वय–प्राणशक्तिचामुंडे[1] संकल्पमेंढे[2] प्रहारूनि, ( तयांचीं मुंडें ) मनोमहिषाचेनि[3] मुंडें वळी दिधलीं.

अर्थ–प्राणशक्तिरूप[1] चामुंडा[1] देवीला[1] संकल्परूपी[2] मेंढे[2] मारून ( त्यांचीं मुंडकीं ) मनोरूपी[3] रेड्याचें[3] मुंडक्यासह वळी दिलीं ( म्ह० अर्पिलीं ).

चंद्रसूर्यां बुझावणी । करूनि अनुहताची सुडावणी ।
सतराविये‍चें पाणी । जिंतिलें वेगीं ॥५४॥

अन्वय–चंद्रसूर्यां बुझावणी, ( आणि ) अनुहताची सुडावणी करूनि, सतरावियेचें पाणी वेगीं जिंतिलें.

अर्थ– ( नंतर ) चंद्रसूर्यांचें ( म्ह० इडा व पिंगला यांतील वाहणाऱ्या वायूंचें, सुषुम्नेंत ) ऐक्य ( करून ) अनाहताचा गजर करून जीवनकलेचें अमृत त्वरेनें जिंकलें ( म्ह० प्राप्त करून घेतलें. )

मग मध्यमामध्यविवरें । तेणें कोरिवें दादरें ।
ठाकिलें चवरें । ब्रह्मरंध्रींचें ॥५५॥

अन्वय–मग मध्यमामध्यविवरें[1] तेणें कोरिवें दादरें ब्रह्मरंध्रींचें चवरें ठाकिलें.

अर्थ– मग सुषुम्नानाडीच्या[1] मध्यांतील[1] पोकळीनें[1] ( म्हणजेच ) त्या कोरीव जिन्यानें ब्रह्मरंध्राचें शिखर गांठलें.

वरी मकारांत सोपान । ते सांडोनियां गहन ।
काखे सूनियां गगन । भरले ब्रह्मीं ॥५६॥

अन्वय– वरी ते मकारांत गहन सोपान सांडोनियां, गगन काखे सूनियां ब्रह्मीं भरले[1].

अर्थ– नंतर ते ( योगी ) ( ओंकारध्वनीची तिसरी मात्रा जो मकार त्या ) मकारान्तरूपानें ( असलेला म्ह० मकार ज्याच्या अंतीं आहे असा तीन मात्रारूप ) कठीण जिना ओलांडून, मूर्ध्न्याकाशाला बगलेंत मारून, ब्रह्मामध्यें प्रवेश[1] करतात[1].

ऐसेन जे समबुद्धि । गिळावया सोहंसिद्धी ।
आंगवितातित निरवधी । योगदुर्गें ॥५७॥

**अन्वय**–ऐसेन जे समबुद्धि, सोहंसिद्धि[1] गिळावया, निरवधी योगदुर्गें[2], आंगवितातित[3].

**अर्थ**–अशाप्रकारें जे ब्रह्मैक्यबुद्धि धारण करणारे योगी ब्रह्मैक्यभावनेचा[1] प्रत्यय[1] घेण्याकरितां अमर्याद योगरूपी[2] किल्ले[2] स्वाधीन[3] करून[3] घेतात[3].

आपुलिया साटोवाटीं । शून्य घेती उठाउठी ।
तेही मातेंचि किरीटी । पावती गा ॥५८॥

**अन्वय**–गा किरीटी, (जे) उठाउठी आपुलिया साटोवाटीं शून्य घेती[2] तेही मातेंचि पावती.

**अर्थ**–अरे अर्जुना, (जे) त्वरेनें आपल्या मोबदल्यानें ( म्ह० आपुलें जीवत्व देऊन ) अव्यक्त घेतात, तेसुद्धां मलाच मिळतात.

वांचूनि योगाचेनि बळें । अधिक कांहीं मिळे ।
ऐसें नाहीं आगळे । कष्टचि तयां ॥५९॥

**अन्वय**—वांचूनि योगाचेनि बळें कांहीं अधिक मिळे ऐसें नाहीं, तयां आगळे कष्टचि[1] ( होती ).

**अर्थ**—एऱ्हवीं योगाच्या सामर्थ्यानें कांहीं जास्त मिळतें, असें नाहीं ( तर ) त्यांना अधिक कष्ट[1] मात्र[1] ( पडतात ).

क्लेशोऽधिकरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।
अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ५ ॥

जिहीं सकळभूतांचिया हितीं ! निरालंबीं अव्यक्तीं ।
पसरालिया आसक्ती । भक्तीवीण ॥६०॥

**अन्वय**–जिहीं सकळभूतांचिया[1] हितीं[2] निरालंबीं अव्यक्तीं[3] भक्तीवीण आसक्ती पसरालिया;

**अर्थ**–ज्यांनीं[1] सर्व प्राण्यांचें[1] ( मूर्तिमंत ) हित[2] असणाऱ्या[2], निराधार अव्यक्ताचें[3] ( ब्रह्माचें ) ठिकाणीं[3] भक्तीशिवाय आवडी धरली;

तयां महेंद्रादि पदें । करिताति वाटवधें ।
आणि ऋद्धिसिद्धींचीं द्वंद्वें । पडोनि ठाती ।।६१।।

अन्वय–तयां महेंद्रादि पदें वाटवधें करिताति, आणि ऋद्धिसिद्धींचीं[1] द्वंद्वें पडोनि ठाती.

अर्थ–त्यांना इंद्रादिकांचे अधिकार वाटमारेपणा करतात ( म्ह० त्यांची वाट अडवितात व त्यांना भुरळ घालतात ) आणि ( पार्थिव ) ऐश्वर्यें[1] ( व ) सिद्धि[1] ( यांचीं[1] ) द्वंद्वें ( त्यांना अडविण्यासाठीं वाटेंत ) पडून राहतात.

कामक्रोधांचे विलग । उठावती अनेग ।
आणि शून्येंसीं आंग । झुंझवावें कीं ।।६२।।

अन्वय–कामक्रोधांचे अनेग विलग उठावती[1], आणि शून्येंसीं आंग झुंझवावें[2] कीं.

अर्थ–कामक्रोधांचे पुष्कळ उपद्रव हल्ला[1] करतात[1] व निराकाराबरोबर शरीर लढवावें[2] लागतें[2] ना ( म्ह० ब्रह्मप्राप्तीसाठीं शरीरानें लढण्याइतके कष्ट करावे लागतात ना ).

ताहाने ताहानचि पियावी । भुकेलिया भूकचि खावी ।
अहोरात्र वावीं । मवावा वारा ।।६३।।

अन्वय–ताहाने ताहानचि पियावी, भुकेलिया[1] भूकचि खावी, अहोरात्र वावीं वारा मवावा.

अर्थ–ताहानेला ताहानच प्यावी (लागते), भूक[1] लागली[1] असतां[1] भूकच खावी ( लागते ); रात्रंदिवस वावांनीं वारा मोजावा (लागतो) ( म्ह० पांघरूण नसल्यामुळें वावांनी वाऱ्यालाच कवळत रहावें लागतें ).

उन्निद्रेयाचें पहुडणें । निरोधाचें वेल्हावणें ।
झाडासी साजणें । चालावे गा ।।६४।।

अन्वय––गा ( अर्जुना ), पहुडणें उन्निद्रेयाचें[1]; वेल्हावणें[2] निरोधाचें, साजणें झाडासी चालावे[3].

अर्थ–– अरे ( अर्जुना ), ( तेथील ) निजणें ( म्हणजे ) जाग्या[1]

मनुष्याचें[1]; प्रेम[2] करणें[2] ( म्हणजे ) निग्रहाचेंच ( व तेथील ) मैत्री वृक्षाबरोबरच करावी[3] लागते[3].

शीत वेढावें । उष्ण पांघुरावें ।

वृष्टीचिया असावें । घराआंतु ॥६५॥

**अन्वय**—शीत वेढावें, उष्ण पांघुरावें[1], वृष्टीचिया घराआंतु असावें.

**अर्थ**—थंडीच नेसावी; उन्हाचेंच पांघरूण[1] घ्यावें[1] ( आणि ) पावसाच्याच घरांत रहावें ( लागतें ).

किंबहुना पांडवा । हा अग्निप्रवेशु नींच नवा ।

भातारेंवीण करावा । तो हा योगु ॥६६॥

**अन्वय**—पांडवा, किंबहुना[1] ( जो ) हा भातारेंवीण नीच नवा अग्निप्रवेशु करावा, तो हा योगु ( असे ).

**अर्थ**—अर्जुना, फार[1] काय[1] सांगावें[1], ( जो ) हा पतिवांचून प्रतिदिनीं नव्यानें अग्निप्रवेश करणें ( म्ह० सती जाणें ) तो हा योग ( होय ).

एथ स्वामीचें काज । ना बापिकें व्याज ।

परि मरणेंसी झुंझ । नित्य नवें ॥६७॥

**अन्वय**-- एथ[1] स्वामीचें कांज ना, बापिकें[2] व्याज ना, परि नित्य नवें मरणेंसीं झुंझ ( असे ).

**अर्थ**---या[1] ठिकाणीं[1] ( म्ह० या योगामध्यें ) धन्याची कामगिरी ( बजावयाची ) नसते; वंशपरंपरा[2] आलेल्या[2] ( वैराच्या सूडाचें ) निमित्त नसतें; तरीपण प्रतिदिवशीं नव्यानें मरणाबरोबर लढाई ( खेळावी लागते ).

ऐसें मृत्यूहूनि तिख । कां घोंटे कढत विख ।

डोंगर गिळितां मुख । न फाटे काई ॥६८॥

**अन्वय**--ऐसें मृत्यूहूनि तिख, कढत विख घोंटे, कां डोंगर गिळितां मुख फाटे न काई.

**अर्थ**---याप्रमाणें मृत्यूपेक्षां जहाल, रसरसीत विष गिळवतें ( काय )? किंवा पर्वत गिळतांना तोंड फाटत ( म्ह० फाटणार ) नाहीं काय ?

म्हणोनि योगाचिया वाटा । जे निगाले गा सुभटा ।

तयां दुःखाचाचि वाटा । भागा आला ॥६९॥

**अन्वय**–गा सुभटा, म्हणोनि जे योगाचिया वाटा निगाले, तयां भागा दुःखाचाचि वांटा आला.

**अर्थ**–अरे सुवीरा ( अर्जुना ), म्हणून जे योगाच्या मार्गाला लागले, त्यांच्या वाट्याला दुःखाचाच अंश ( विभाग ) आला.

पाहें पां लोहाचे चणे । जैं बोचरिया पडती खाणें ।

तैं पोट भरणें कीं प्राणें । शुद्धी म्हणों ॥७०॥

**अन्वय**–पाहें[1] पां, जैं लोहाचे चणे, बोचरिया[2] खाणें पडती, तैं ( तें ) पोट भरणें म्हणों, कीं प्राणें शुद्धी ( म्हणों ).

**अर्थ**–विचार[1] कर[1], वरें, जर लोखंडाचे फुटाणे, दंतहीन[2] माणसाला[2] खावे लागले, तर ( त्या कृत्याला ) पोट भरणें म्हणूं; का प्राणाशीं गांठ ( म्हणूं ) ? ( म्ह० जीव गमावणें म्हणूं ? )

म्हणोनि समुद्र बाहीं । तरणें आथि केंही ।

कां गगनामाजीं पाईं । खोलिजतु असे ॥७१॥

**अन्वय**–म्हणोनि बाहीं समुद्र तरणें केंही आथि; कां पाईं गगनामाजीं खोलिजतु असे.

**अर्थ**–म्हणून बाहूंनीं समुद्र तरणें कोठें ( शक्य ) आहे ? अथवा पायांनीं आकाशामध्यें चालतां येतें ?

वळघलिया रणाची थाटी । आंगीं न लगतां काठी ।

सूर्याची पाउटी । कां होय गा ॥७२॥

**अन्वय**–गा, रणाची थाटी वळघलिया[1] आंगीं काठी[2] न लगतां सूर्याची पाउटी होय कां.

**अर्थ**–अरे ( अर्जुना ), युद्धाच्या गर्दींत शिरलें[1] असतां[1] अंगावर कांठीचा[2] प्रहार[2] न बसतां सूर्याची ( म्ह० सूर्यबिंब ही ) पायरी होईल काय ?

यालागीं पांगुळा हेवा । नव्हे वायूसि पांडवा ।
तेवीं देहवंता जीवां । अव्यक्तीं गति ॥७३॥

**अन्वय**–पांडवा, यालागीं ( जेवीं ) पांगुळा वायूसि हेवा नव्हे[१], तेवीं देहवंता जीवां अव्यक्तीं[२] गति ( नोहे ).

**अर्थ**–अर्जुना, म्हणून ( ज्याप्रमाणें ) पांगळ्याची वायूबरोबर स्पर्धा संभवत[१] नाहीं[१], त्याप्रमाणें शरीरधारी प्राण्यांना अव्यक्ताच्या[२] ठिकाणीं[२] प्रवेश ( होत नाहीं ).

ऐसाही जरी धिंवसा । बांधोनियां आकाशा ।
झोंबती तरी क्लेशा । पात्र होती ॥७४॥

**अन्वय**–ऐसाही[१] जरी धिंवसा बांधोनियां आकाशा झोंबती[२], तरी क्लेशा पात्र होती.

**अर्थ**–अशाहि[१] प्रकारचा[१] जर ( कोणी ) उत्साह धरून आकाशाला बिलगूं[२] पाहतील[२] ( शब्दशः –बिलगतात ), तर ( ते केवळ ) कष्टालाच योग्य होतील ( शब्दशः –होतात ).

म्हणोनि येर ते पार्था । नेणतीचि हे व्यथा ।
जे कां भक्तिपंथा । वोटंगले ॥७५॥

**अन्वय**–पार्था, म्हणोनि जे कां भक्तिपंथा वोटंगले[१], ते येर हे व्यथा नेणतीचि[२].

**अर्थ**–अर्जुना, म्हणून जे ( कोणी ) भक्तिमार्गाचा आश्रय[१] करतात[१]; ते दुसरे ( भक्त ) हें दुःख जाणतच[२] नाहींत[२] ( म्ह० त्यांना दुःख भोगावें लागत नाहीं ).

**ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।**
**अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ॥ ६ ॥**

कर्मेंद्रियें सुखें । करिती कर्मे अशेखें ।
जियें कां वर्णविशेखें । भागा आलीं ॥७६॥

**अन्वय**—जियें कां कर्में वर्णविशेखें भागा आलीं ( तियें ) अशेखें

( कर्में ) कर्मेंद्रियें सुखें करिती.

**अर्थ**--जीं म्हणून कर्में ( आपआपल्या ) विशिष्टवर्णानुसार ( भक्तांच्या ) वाट्याला येतात, ( तीं ) सगळीं ( कर्में ) ( त्यांचीं ) कर्मेंद्रियें आनंदानें करतात.

विधींतें पाळित । निषेधातें गाळित ।
मज देऊनि जाळित । कर्मं फळें ॥७७॥

**अन्वय**--विधींतें पाळित[१], निषेधातें गाळित[२], मज कर्मफळें[३] देऊनि ( कर्मं ) जाळित[४].

**अर्थ**--विधींचें पालन[१] करतात[१] ( म्ह० शास्त्रांनीं सांगितलेली कर्में करतात ), निषिद्धाचा ( म्ह० शास्त्रानें मनाई केलेल्या कर्मांचा ) त्याग[२] करतात[२] ( आणि ) मला कर्मांचीं[३] फळें[३] देऊन ( कर्में ) जाळून[४] टाकतात[४] ( म्ह० भोग द्यावयास शिल्लक ठेवीत नाहींत ).

ययापरी पाहीं । अर्जुना माझे ठाईं ।
संन्यासूनि नाहीं । करिती कर्में ॥७८॥

**अन्वय**--अर्जुना पाहीं[१], ययापरी माझे ठाईं ( कर्मफळें ) संन्यासूनि[२] कर्में नाहीं करिती.

**अर्थ**--अर्जुना, विचार[१] कर[१]; याप्रमाणें माझ्या ठिकाणीं ( कर्मफळें ) अर्पण[२] करून[२] ( तीं ) कर्में नष्ट करतात.

आणिकही जे जे सर्व । कायिक वाचिक मानसिक भाव ।
तयां मीवांचूनि धांव । आनौती नाहीं ॥७९॥

**अन्वय**--आणिकही जे जे सर्व कायिक वाचिक मानसिक भाव, तयां मीवांचूनि आनौती धांव नाहीं.

**अर्थ**--आणखीहि जे जे सर्व शरीराचे, वाणीचे ( व ) मनाचे व्यापार ( आहेत ), त्यांना मीसोडून दुसरी गति ( अर्थात् आश्रय ) नाहीं.

ऐसे जे मत्पर । उपासिती निरंतर ।
ध्यानमिषें घर । माझें झाले ॥ ८० ॥

**अन्वय**–ऐसे[1] जे मत्पर[2], निरंतर ( मज ) उपासिती[3] ( ते ) ध्यान-मिषें[4] माझें घर झाले.

**अर्थ**–अशा[1] प्रकाराचे[1] जे मलाच[2] वाहिलेले[2] असतात[2], ( व ) अखंड ( माझीच ) उपासना[3] करतात[3] ( ते ) ध्यानाच्या[4] साधनानें[4] माझें ( राहण्याचें ) ठिकाण होतात ( शद्बशः–झाले ).

जयांचिया आवडी । केली मजशीं कुळवाडी ।
भोग मोक्ष बापुडीं । त्यजिलीं कुळें ॥ ८१ ॥

**अन्वय**––जयांचिया आवडी, मजशीं कुळवाडी केली, भोग[1] मोक्ष बापुडीं कुळें त्यजिलीं[2].

**अर्थ**–ज्यांच्या प्रेमानें माझ्याशीं ( कुळसंबंधाचा ) व्यवहार केला ( व ) ऐहिक[1] सुखें[1] ( आणि ) मोक्ष ( हीं ) गरीब ( शेत करणारीं ) कुळें टाकून[2] दिलीं[2].

ऐसे अनन्ययोगें । विकले जीवें मनें आंगें ।
तयांचें कायि एक सांगें । जें सर्व मी करीं ॥ ८२ ॥

**अन्वय**––ऐसें अनन्ययोगें जीवें मनें आंगें ( जे मज ) विकले, तयांचें कायि एक सांगें, जें सर्व मी करीं.

**अर्थ**––याप्रमाणें अनन्यभक्तीनें जीवानें मनानें ( व ) शरीरानें ( जे स्वतःस मला ) विकतात ( शद्बशः–विकले गेले ), त्यांची काय एकच ( गोष्ट मी करतों म्हणून ) सांगूं; कारण ( त्यांचें ) सर्वच ( म्ह० प्रत्येक कार्य ) मी करतों.

**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।**
**भवामि न चिरात्पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥ ७ ॥**

किंबहुना धनुर्धरा । जो मातेचिया ये उदरा ।
तो मातेचा सोयरा । केतुला पां ॥ ८३ ॥

**अन्वय**––धनुर्धरा, किंबहुना[1] जो मातेचिया उदरा ये, तो मातेचा केतुला पां सोयरा ( असे ).

**अर्थ**––अर्जुना, फार[1] काय[1] सांगावें[1], जो आईच्या पोटाला येतो

( म्ह० पोटीं जन्मतो ), तो आईचा किती बरें आवडता ( असतो ) ?

तेवीं मी तयां । जैसे असती तैसियां ।
कळिकाळ नोकोनियां । घेतला पटा ॥ ८४ ॥

**अन्वय**--तेवीं ( ते ) जैसे असती, तैसियां तयां मी ( असें ), कळिकाळ नोकोनियां[1] ( मी ) पटा घेतला.

**अर्थ**–त्याप्रमाणें ( ते ) जसे ( म्ह० ज्या स्थितींत ) असतात, तशांना त्यांना मी ( आईप्रमाणें असतों ); ( आणि ) कळिकाळाचाहि ( म्ह० मृत्युसारख्या संकटांचाहि ) पराभव[1] करून[1] ( म्ह० निवारण करून ) ( मीं त्यांचा ) पतकरा ( भार ) घेतला ( आहे ).

एऱ्हवीं तरी माझिया भक्तां । आणि संसाराची चिंता ।
काय समर्थांची कांता । कोरान्न मागे ॥ ८५ ॥

**अन्वय**--एऱ्हवीं[1] तरी[1] माझिया भक्तां आणि ( तयां ) संसाराची चिंता, समर्थांची कांता कोरान्न[1] मागे काय ?

**अर्थ**--एऱ्हवींसुद्धां[1] माझे भक्त ! ( शब्दशः—माझ्या भक्तांना ) आणि ( त्यांना ) संसाराची काळजी ? ( असें कधींच घडणार नाहीं ); श्रीमंताची बायको कोरडी[1] भिक्षा[1] मागेल काय ?

तैसे ते माझे । कलत्र हें जाणिजे ।
कायिसेनिही न लाजें । तयांचेनि मी ॥ ८६ ॥

**अन्वय**—तैसे ते माझे कलत्र हें जाणिजे[1], तयांचेनि कायिसेनिहीं मी न[2] लाजें[2].

**अर्थ**—त्याप्रमाणें ते माझे कुटुंब ( आहेत ), असें समजावें ( शब्दशः—समजलें[1] जातें[1] ). त्यांच्या कशाहिमुळें ( म्ह० कोणत्याहि करावयाच्या गोष्टीनें ) मी लाजत नाहीं ( म्ह० मला लाज[2] वाटत[2] नाहीं[2] ).

जन्ममृत्यूचिया लाटीं । झळंबती इया सृष्टी ।
तें देखोनियां पोटीं । ऐसें जाहलें ॥ ८७ ॥

**अन्वय**--इया सृष्टी जन्ममृत्यूचिया लाटीं झळंबती[1], तें देखोनिया

पोटीं ऐसें जाहलें.

**अर्थ**--हीं भुवनें जन्ममृत्यूच्या लाटांत गटंगळ्या[१] खात[१] आहेत[१], हें पाहून ( माझ्या ) मनांत असें आलें ( म्ह० असा विचार आला ).

भवसिंधूचेनि माजें । कवणासि धाकु नुपजे ।
येथ जरी कीं माझे । बिहिती ह्न ॥ ८८ ॥

**अन्वय**--भवसिंधूचेनि माजें कवणासिं धाकु नुपजे[१], येथ[२] जरी कीं माझे बिहिती.

**अर्थ**--संसारसागराच्या पुरानें ( खळबळाटानें ) कोणाला भय उत्पन्न[१] होत[१] नाहीं[१], या[२] ठिकाणीं[२] जर कदाचित् माझे ( भक्त ) भितील ( तर ).

म्हणोनि गा पांडवा । मूर्तीचा मेळावा ।
करूनि त्यांचिया गांवा । धांवतु आलों ॥ ८९ ॥

**अन्वय**--गा पांडवा, म्हणोनि मूर्तीचा मेळावा करूनि त्यांचिया गांवा धांवतु आलों.

**अर्थ**--अरे अर्जुना, म्हणून शरीराचा संयोग करून ( म्ह० मनुष्य देह धारण करून मी ) त्यांच्या गांवाला ( म्ह० मृत्युलोकाला ) धांवत आलों.

नामाचिया सहस्त्रवरी । नावा इया अवधारीं ।
सजूनियां संसारीं । तारू जाहलों ॥ ९० ॥

**अन्वय**-- ( अर्जुना ) अवधारीं[१], इया सहस्त्रवरी[१] नामाचिया नावा सजूनियां[२] संसारीं तारू जाहलों.

**अर्थ**-- ( अर्जुना ) लक्षांत[१] ठेव[१]; ह्या एक[१] हजारपर्यंत[१] ( अर्थात् हजारों नामांच्या होड्या सिद्ध[२] करून[२] ( मी भक्तांना ) संसारसागरांतून ( तारण्यासाठीं ) तारक झालों.

सडे जे देखिले । ते ध्यानकासे लाविले ।
परिग्रही घातले । तरियांवरी ॥ ९१ ॥

**अन्वय**—जे सडे देखिले, ते ध्यानकासे लाविले, परिग्रही तरियांवरी घातले.

अर्थ---जे ( भक्त ) एकटे ( म्ह० अंतर्बाह्य परिग्रहरहित ) पाहिले, ते ध्यानाच्या कांचाला ( म्ह० ध्यानमार्गाला ) लावले, ( व ) कुटुंबी ( म्ह० परिग्रही ) ( नामरूपी ) नौकांवर घातले.

प्रेमाची पेटी । बांधली एकांचां पोटीं ।
मग आणिले तटीं । सायुज्याचिया ॥ ९२ ॥

अन्वय---एकांचां[1] पोटीं प्रेमाची पेटी बांधली, मग सायुज्याचिया तटीं आणिले.

अर्थ---कांहीं[1] जणांच्या[1] पोटाला प्रेमाची सांगड बांधली, नंतर ( त्यांना ) मोक्षाच्या तीराला आणलें.

परि भक्तांचेनि नांवें । चतुष्पदादि आघवे ।
वैकुंठींचिये राणिवे । योग्य केले ॥ ९३ ॥

अन्वय---परि भक्तांचेनि नांवें चतुष्पदादि आघवे वैकुंठींचिये राणिवे योग्य केले.

अर्थ---परंतु भक्तांच्या नांवानें ( म्ह० भक्त म्हणून ) पश्वादि सर्व ( प्राण्यांना ) वैकुंठांतल्या ( अर्थात् वैकुंठाच्या ) राज्यावर ( बसण्यास ) पात्र केलें.

म्हणोनि गा भक्तां । नाहीं एकही चिंता ।
तयातें समुद्धर्ता । आथी मी सदा ॥ ९४ ॥

अन्वय---गा, मी सदा तयांतें समुद्धर्ता[1] ( असें ) म्हणोनि भक्तां एकही चिंता नाहीं.

अर्थ---अरे ( अर्जुना ), मी नेहमींच त्यांचा उद्धार[1] करणारा[1] ( असतों ) म्हणून ( त्या माझ्या ) भक्तांना एकही काळजी नसते.

आणि जेव्हांचि का भक्तीं । दिधली आपुली चित्तवृत्ती ।
तेव्हांचि मज सूती । त्यांचिये नाटीं ॥ ९५ ॥

अन्वय---आणि जेव्हांचि भक्तीं आपुली चित्तवृत्ती दिधली तेव्हांचि मज त्यांचिये नाटीं सूती.

**अर्थ**--आणि ज्यावेळेसच भक्त ( शब्दशः --भक्तांनीं ) आपुली चित्तवृत्ति ( मला ) देतात ( शब्दशः --अर्पण केली ), त्यावेळेसच ( ते ) मला त्यांच्या छंदांत घालतात.

याकारणें गा भक्तराया । हा मंत्र तुवां धनंजया ।
कीजे जे यया । मार्गा भजिजे ॥ ९६ ॥

**अन्वय**--गा भक्तराया धनंजया, याकारणें हा मंत्र तुवां कीजे, जे यया मार्गा भजिजे[1].

**अर्थ**--अरे भक्तश्रेष्ठा अर्जुना, एवढ्याकरितां हें रहस्य तूं अनुसरावें; ( तें हें ) कीं, " ह्या मार्गाचा आश्रय[1] करावा[1]. "

**मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।**
**निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥ ८ ॥**

अगा मानस हें एक । माझ्या स्वरूपीं वृत्तिक ।
करूनि घालीं निष्टंक । बुद्धि निश्चयेंसी ॥ ९७ ॥

**अन्वय**--अगा, हें एक मानस माझ्या स्वरूपीं[1] निष्टंक वृत्तिक करूनि घालीं ( आणि ) बुद्धि निश्चयेंसी ( माझ्या स्वरूपीं घालीं ).

**अर्थ**--अरे ( अर्जुना ), हें ( केवळ ) एक मन माझ्या स्वरूपाच्या[1] ठिकाणीं[1] पूर्णपणें वतनदार करून ठेव ( तशीच ) बुद्धिही निश्चयानें ( माझ्या ठिकाणीं लाव. )

इयें दोनी सरिसीं । मजमाजीं प्रेमेसीं ।
रिगालीं तरी पावसी । मातें तूं गा ॥ ९८ ॥

**अन्वय**--गा ( जरी ) इयें दोनी सरिसीं मजमाजीं[1] प्रेमेसीं रिगालीं[2], तरी तूं मातें पावसी.

**अर्थ**--अरे ( अर्जुना ), ( जर ) हीं दोन्हीं जोडीनें माझ्या[1] ठिकाणीं[1] प्रेमानें प्रविष्ट[2] झालीं[2], तर तूं मला ( निश्चयानें ) पोहोचशील.

जे मन बुद्धि इहीं । घर केलें माझ्या ठायीं ।
तरि सांगें मग काई । मी तूं ऐसें उरे ॥ ९९ ॥

अन्वय---जे मन बुद्धि इहीं माझ्या ठायीं घर केलें, तरि मग मी तूं ऐसें उरे काई, सांगें.

अर्थ---कारण मन ( व ) बुद्धि यांनीं माझ्या ठिकाणीं वास्तव्य केलें, तर मग ' मी तूं असें ( म्ह० असा भेद ) उरेल काय ? ' बोल.

म्हणोनि दीप पाल्वे । सवेंचि तेज माल्वे ।

कां रविबिंबासवें । प्रकाशु जाय ।। १०० ।।

अन्वय---म्हणोनि ( जैं ) दीप पालवे[1] ( तैं ) सवेंचि तेज मालवे[2], कां रविबिंबासवें प्रकाशु जाय.

अर्थ---म्हणून ( जेव्हां ) दिवा पदराच्या[1] वाऱ्यानें[1] जातो[1], (तेव्हां) ( त्या ) बरोबरच ( त्याचा ) प्रकाश नाहींसा[2] होतो[2], अथवा सूर्य-बिंबाबरोबर ( जसा ) प्रकाश जातो.

उचलल्या प्राणासरिसीं । इंद्रियेंही निगती जैसीं ।

तैसा मनोबुद्धिपाशीं । अहंकारु ये ।। १०१ ।।

अन्वय---उचलल्या[1] प्राणासरिसीं जैसीं इंद्रियेंही निगती, तैसा मनोबुद्धिपाशीं अहंकारु ये.

अर्थ---जावयास[1] निघालेल्या[1] प्राणाबरोबर ज्याप्रमाणें इंद्रियेंसुद्धां निघतात, त्याप्रमाणें मनबुद्धीबरोबर अहंकार येतो.

म्हणोनि माझिया स्वरूपीं । मनबुद्धि इयें निक्षेपीं ।

येतुलेनि सर्वव्यापी । मीचि होसी ।। १०२ ।।

अन्वय---म्हणोनि माझिया स्वरूपीं[1] इयें मनबुद्धि[2] निक्षेपीं, येतुलेनि सर्वव्यापी मीचि होसी.

अर्थ---म्हणून माझ्या स्वरूपाच्या[1] ठिकाणीं[1] हीं मन[2] ( व ) बुद्धि[2] ठेव, एवढ्यानें सर्वव्यापक ( असा ) मीच ( तूं ) होशील ( शब्दशः--- होतोस ).

यया बोला कांहीं । अनारिसें नाहीं ।

आपुली आण पाहीं । वाहतु असें गा ।। १०३ ।।

**अन्वय**---गा ( अर्जुना ) पाहीं[1], यया बोला कांहीं अनारिसें नाहीं, आपली आण वाहतु असें.

**अर्थ**---अरे ( अर्जुना ) विचार[1] कर[1], या बोलण्यांत कांहीं अन्यथा नाहीं; ( या संबंधांत मी ) स्वतःची शपथ वाहत आहें.

**अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम् ।**
**अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनंजय ॥ ९ ॥**

अथवा हें चित्त । मनबुद्धीसहित ।
माझ्या हातीं अचुंबित । न शकसी देवों ॥१०४॥

**अन्वय**-अथवा मनबुद्धीसहित हें चित्त माझ्या हातीं अचुंबित देवों न शकसी.

**अर्थ**---किंवा मनबुद्धीसह हें चित्त माझ्या ताब्यांत सर्वस्वीं देण्यास समर्थ नसलास ( तर )--

तरि गा ऐसें करीं । यया आठां पाहारां माझारीं ।
मोटकें निमिषभरी । देतु जाय ॥१०५॥

**अन्वय**---गा ( अर्जुना ) तरि ऐसें करीं, यया आठां पाहारांमाझारीं मोटकें निमिषभरी देतु जाय.

**अर्थ**---अरे ( अर्जुना ) तर असें कर; या आठ प्रहरांमध्यें ( तें चित्त माझ्या ठिकाणीं ) मोजकें क्षणभर देत जा.

मग जें जें कां निमिख । देखेल माझें सुख ।
तेतुलें अरोचक । विषयीं घेईल ॥१०६॥

**अन्वय**---मग जें जें निमिख माझें सुख देखेल, तेतुलें[1] विषयीं[2] अरोचक घेईल.

**अर्थ**---मग जो जो क्षण माझा आनंद पाहील, तितक्या[1] प्रमाणानें[1] ( अर्थात् तेवढ्या प्रमाणांत ) ( चित्ताला ) विषयांच्या[2] बाबतींत[2] वीट येईल.

जैसा शरत्कालु रिगे । आणि सरिता वोहटूं लागे ।
तैसें चित्त काढेल वेगें । प्रपंचौनी ॥१०७॥

**अन्वय**--जैसा शरत्कालु रिगे, आणि सरिता वोहट्टूं लागे, तैसें चित्त प्रपंचौनी वेगें काढेल.

**अर्थ**---ज्याप्रमाणें शरदृऋतु प्रकटतो, आणि नदी ( तात्काळ ) ओसरूं लागते, त्याप्रमाणें ( चित्त ) संसारांतून वेगानें निघेल.

मग पुनवेहूनि जैसें । शशिबिंब दिसेंदिसें ।
हारपत अंवसे । नाहींचि होय ॥१०८॥

**अन्वय**---मग जैसें शशिबिंब पुनवेहूनि दिसेंदिसें हारपत[1] अंवसे नाहींचि होय.

**अर्थ**---अथवा ज्याप्रमाणें चंद्रबिंब पौर्णिमेपासून दिवसादिवसानें कमी-कमी[1] होत[1] अमावस्येला ( पूर्णतः ) नाहींसेंच होतें.

तैसें भोगाआंतूनि निगतां । चित्त मजमाजीं रिगतां ।
हळू हळू पांडुसुता । मीचि होईल ॥१०९॥

**अन्वय**--पांडुसुता, तैसें चित्त भोगाआंतूनि निगतां[1] मजमाजीं रिगतां[2] हळू हळू मीचि होईल.

**अर्थ**---अर्जुना, त्याप्रमाणें चित्त विषयभोगांतून निघत[1] निघत[1] माझ्या-मध्यें प्रवेश[2] करीत[2] करीत[2] ( विषयभोगांतून पूर्णतः निघेल आणि ) हळू हळू मद्रूप होईल.

अगा अभ्यासयोगु म्हणिजे । तो हा एकु जाणिजे ।
येणें कांहीं न निपजे । ऐसें नाहीं ॥११०॥

**अन्वय**--अगा, ( जो ) अभ्यासयोगु म्हणिजे[1], तो हा एकु जाणिजे, येणें कांहीं न निपजे, ऐसें नाहीं.

**अर्थ**--अरे ( अर्जुना ), ( जो ) अभ्यासमार्ग म्हटला[1] जातो[1]; तो हाच एक समजावा, यानें कांहीं साधत नाहीं, असें नाहीं.

पैं अभ्यासाचेनि बळें । एकां गति अंतराळें ।
व्याघ्र सर्प प्रांजळे । केले एकीं ॥१११॥

**अन्वय**---( पैं ) अभ्यासाचेनि बळें एकां अंतराळें गति ( झाली )

एकीं व्याघ्र[1] सर्प[1] प्रांजळे केले.

**अर्थ**–(पहा), अभ्यासाच्या सामर्थ्यानें एकांना (गोरखनाथांसारख्यांना) आकाशांत गमनसामर्थ्य (प्राप्त झालें); कित्येकांनीं (चांगदेवांसारख्यांनीं) वाघ[1]–सापहि[1] नम्र केले.

विष कीं आहारीं पडे । समुद्रीं पायवाट जोडे ।
एकीं वाग्ब्रह्म थोकडें । अभ्यासें केलें ॥११२॥

**अन्वय**––विष कीं आहारीं पडे, समुद्रीं पायवाट जोडे[1], एकीं अभ्यासें वाग्ब्रह्म थोकडें केलें.

**अर्थ**––विष सुद्धां पचनीं पडतें; समुद्रावरही पायवाट प्राप्त[1] होतें[1]; कित्येकांनीं अभ्यासानें वेद अल्प (म्ह० हस्तगत अर्थात् कंठगत) केले.

म्हणोनि अभ्यासासि कांहीं । सर्वथा दुष्कर नाहीं ।
यालागीं माझ्या ठायीं । अभ्यासें मिळ ॥११३॥

**अन्वय**––म्हणोनि अभ्यासासि कांहीं[1] सर्वथा दुष्कर नाहीं, यालागीं माझ्या ठायीं अभ्यासें मिळ[2].

**अर्थ**––म्हणून अभ्यासाला कोणतीही[1] गोष्ट[1] मुळींच कठिण नाहीं; याकरितां माझ्या ठिकाणीं अभ्यासानें प्राप्त[2] हो[2].

**अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।**
**मदर्थमपि कर्माणि कुर्वन् सिद्धिमवाप्स्यसि ॥ १०॥**

कां अभ्यासाही लागीं । कसु नाहीं तुझिया आंगीं ।
तरी आहासी जया भंगीं । तैसाचि असें ॥११४॥

**अन्वय**––कां अभ्यासाही लागीं कसु तुझिया आंगीं नाहीं, तरी जया भंगीं आहासी, तैसाचि असें.

**अर्थ**––अथवा अभ्यासासाठीं सुद्धां (लागणारें) बळ (जर) तुझ्या अंगांत नसेल, तर ज्या रीतींत (अर्थात् स्थितींत) (तूं) आहेस, त्याच (रीतींत) रहा.

इंद्रियें न कोंडीं । भोगातें न तोडीं ।
अभिमानु न संडीं । स्वजातीचा ॥११५॥

अन्वय--इंद्रियें न कोंडीं, भोगातें न तोडीं, स्वजातीचा[1] अभिमानु न संडीं.

अर्थ--इंद्रियें कोंडूं ( म्ह० इंद्रियांचें दमन करूं ) नकोस, विषयभोगांना टाकूं नकोस ( आणि ) आपल्या[1] जातीचा[1] अभिमान टाकूं नकोस.

कुळधर्मु चाळीं । विधि निषेध पाळीं ।
मग सुखें तुज सरळी । दिधली आहे ॥११६॥

अन्वय---कुळधर्मु चाळीं, विधिनिषेध[1] पाळीं, मग तुज सुखें सरळी दिधली आहे.

अर्थ---कुळाचार चालव, ( कर्माविषयीं ) शास्त्राची[1] आज्ञा[1] ( व ) बंदी[1] पाळ; नंतर ( असें तूं केल्यास ) ( मीं ) तुला निःशंकपणें ( वागण्यास ) मोकळीक दिली आहे.

परि मनें वाचा देहें । जैसा जो व्यापारु होये ।
तो मी करितु आहें । ऐसें न म्हणें ॥११७॥

अन्वय--परि मनें वाचा देहें जो व्यापारु जैसा होये, तो ( तैसा ) 'मी करितु आहें' ऐसें न म्हणें.

अर्थ--परंतु मनानें वाणीनें ( व ) देहानें जें कर्म जसें घडतें, तें ( तसें ) "मी करीत आहें" असें म्हणूं नकोस.

करणें कां न करणें । हें आघवें तोचि जाणे ।
विश्व चळतसे जेणें । परमात्मेनि ॥११८॥

अन्वय--करणें कां न करणें, हें आघवें, जेणें परमात्मेनि विश्व चळतसे तोचि जाणे.

अर्थ---( असुक ) करावें किंवा ( तमुक ) न करावें, हें सर्व, ज्या परमात्म्याकडून ( म्ह० ज्याच्या सत्तेनें ) ( हें सर्व ) जग चालतें तोच जाणतो.

उणेयापुरेयाचें कांहीं । उरों नेदीं आपुलिया ठायीं ।
स्वजाती करूनि घेई । जीवत्व आपुलें ॥११९॥

**अन्वय**–उणेयापुरेयाचें[1] कांहीं आपुलिया ठायीं उरों[2] नेदीं[2]; आपुलें जीवत्व स्वजाती[3] करूनि घेईं.

**अर्थ**–( कर्म ) अपूर्णाचा[1] ( म्ह० असांग होतें ) ( कां ) संपूर्णाचा[1] ( म्ह० सांग होतें ) ( याविषयींचा ) कांहीं ( खेद अथवा संतोष ) आपल्या ठिकाणीं राहूं[2] देऊं[2] नकोस[2]. ( तूं ) आपुलें जीवित ( म्ह० आयुष्यक्रम ) आपल्या[3] जातीशीं[3] ( योग्य ) करून घे ( म्ह० स्ववर्णाला योग्य अशीं कर्में कर ).

माळियें जेउतें नेलें । तेउतें निवांताचि गेलें ।
तया पाणिया ऐसें केलें । होआवें गा ॥१२०॥

**अन्वय**––गा, जेउतें ( पाणी ) माळियें नेलें[1], तेउतें निवांतचि गेलें, तया पाणिया[2] ऐसें[2] केलें होआवें.

**अर्थ**––अरे ( अर्जुना ), जिकडे ( पाणी ) माळ्याकडून नेलें[1] जातें[1], तिकडे शांतपणानें ( तें ) जातें, त्या पाण्यासारखें[2] ( अभिमानरहित आपलें ) कर्म व्हावें.

एऱ्हवीं तरी सुभटा । उजू कां अव्हांटा ।
रथु काई खटपटा । करितु असे ॥१२१॥

**अन्वय**––सुभटा, एऱ्हवीं तरी रथु उजू कां अव्हांटा खटपटा करितु असे काई.

**अर्थ**––सुवीरा ( अर्जुना ), एरव्हीं तरी रथ ( हा ) सरळ ( मार्ग आहे ) किंवा आडमार्ग ( आहे, हे पाहण्याची ) खटपट ( अर्थात् उद्योग ) ( कधीं ) करीत असतो काय ? ( तो रथ जिकडे सारथी नेईल तिकडे जातो ).

म्हणोनि प्रवृत्ति आणि निवृत्ती । इयें वोझीं नेघें मती ।
अखंड चित्तवृत्ती । आठवीं मातें ॥१२२॥

**अन्वय**––म्हणोनि प्रवृत्ति[1] आणि निवृत्ती[2] इयें वोझीं मती नेघें[3] ( आणि ) मातें चित्तवृत्ती अखंड आठवीं.

**अर्थ**––म्हणून ( कर्म करण्यास ) प्रवृत्त[1] होणें[1] आणि ( कर्मा-

पासून ) परावृत्त[२] होणें[२] हे ( दोन्हीं ) भार मनानें घेऊं[३] नकोस[३] ( आणि ) मला मनानें निरंतर स्मर.

आणि जें जें कर्म निपजे । तें थोडें बहु न म्हणिजे ।
निवांतचि अर्पिजे । माझ्या ठायीं ॥१२३॥

अन्वय--आणि जें जें कर्म निपजे तें थोडें बहु न[१] म्हणिजे[१] माझ्या ठायीं निवांतचि अर्पिजे[२].

अर्थ--आणि जें जें कर्म घडेल ( शब्दशः--घडतें ) तें ( तें ) थोडें ( अथवा ) फार म्हणण्यांत[१] येऊं[१] नये[१]; ( तर तें तें कर्म ) माझ्या ठिकाणीं निमूटपणें अर्पण[२] केलें[२] जावें[२].

ऐसिया मद्भावना । तनुत्यागीं अर्जुना ।
तूं सायुज्यसदना । माझिया येसी ॥१२४॥

अन्वय--अर्जुना ऐसिया मद्भावना तनुत्यागीं तूं माझिया सायुज्यसदना[१] येसी.

अर्थ--अर्जुना, अशा मद्‌विषयकनिष्ठेनें ( कर्म केलेंस म्हणजे ) देहान्तीं ( म्ह० देहपातानंतर ) तूं माझ्या सायुज्यमुक्तिरूप[१] घराला[१] ( म्ह० सायुज्यमोक्षाला ) येशील ( शब्दशः--येतोस ).

अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः ।
सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥ ११ ॥

ना तरी हेंही तुज । नेदवे कर्म मज ।
तरी गा तूं भज । पांडुकुमरा ॥१२५॥

अन्वय--गा पांडुकुमरा, ना[१] तरी[१] हेंही कर्म तुज मज नेदवे[२], तरी तूं ( ऐसें ) भज[३].

अर्थ--अरे पांडुपुत्रा ( म्ह० अर्जुना ), किंवा[१] हेंसुद्धां कर्म तुला मला देववत[२] नसेल[२] ( म्ह० अर्पण करवत नसेल ) ( शब्दशः--देववत नाहीं ) तर तूं ( पुढें सांगितल्याप्रमाणें ) आचरण[३] कर[३].

बुद्धीचिये पाठीं पोटीं । कर्माआदि कां शेवटीं ।
मातें बांधणें किरीटी । दुवाड जरी ॥१२६॥

**अन्वय**–किरीटी, कर्माआदि[1] बुद्धीचिये पोटीं कां ( कर्मा ) शेवटीं ( बुद्धीचिये ) पाठीं मातें बांधणें जरी दुवाड.

**अर्थ**—अर्जुना, कर्मांच्या[1] आरंभीं[1] संकल्पाचे पूर्वी ( आधीं ) व ( कर्माचें ) अंतीं ( संकल्पसिद्धीच्या ) नंतर मला स्मरणें जर ( तुला ) अवघड ( जात असेल तर– ).

तरि हेंही असो । सांडीं माझा अतिसो ।

परि संयतिसीं वसो । बुद्धि तुझी ॥१२७॥

**अन्वय**—तरि हेंहि असो[1], माझा अतिसो सांडीं[2], परि तुझी बुद्धि संयतिसीं[3] वसो[3].

**अर्थ**—तर हेंसुद्धां ( म्ह० माझें स्मरण ठेवणें व कर्मफल मला अर्पण करणें ) असूं[1] दे[1]; माझा आग्रह सोडून[2] दे[2], परंतु तुझी बुद्धि निग्रहाचे[3] ठिकाणीं[3] राहूं[3] दे[3] ( म्ह० तूं आपल्या बुद्धींत कर्तृत्वमद व फलास्वाद घेऊं नकोस ).

आणि जेणें जेणें वेळें । घडती कर्में सकळें ।

तयांचीं तियें फळें । त्यजितु जाय ॥१२८॥

**अन्वय**—आणि जेणें जेणें वेळें ( जियें ) सकळें कर्में घडती ( तेणें तेणें वेळें ) तयांचीं तियें फळें त्यजितु जाय.

**अर्थ**—आणि ज्या ज्या वेळीं ( जीं जीं ) ( कांहीं ) सर्व कर्में घडतील ( शब्दशः –घडतात ) ( त्या त्या वेळीं ) त्यांचीं तीं ( सर्व ) फळें टाकीत जा.

वृक्ष कां वेली । लोटती फळें आलीं ।

तैसीं सांडीं निपजलीं । कर्में सिद्धें ॥१२९॥

**अन्वय**—वृक्ष कां वेली आलीं फळें लोटती[1], तैसीं सिद्धें निपजलीं कर्में सांडीं[2].

**अर्थ**—( ज्याप्रमाणें ) झाडें अथवा वेली आलेलीं फळें टाकून[1] देतात[1], त्याप्रमाणें पूर्ण झालेलीं कर्में ( तूं ) टाकून[2] दे[2].

परि मातें मनीं धरावें । कां मजउद्देशें करावें ।
हें कांहीं नको आघवें । जाऊं दे शून्यीं ॥१३०॥

अन्वय--परि मातें मनीं धरावें, कां मजउद्देशें (कर्म) करावें, हें कांहीं नको, आघवें शून्यीं जाऊं दे.

अर्थ--परंतु मला मनांत बाळगावें (स्मरावें), अथवा मदर्थ (कर्म) करावें, हें कांहींहि नको; (हें) सर्व आकाशांत जाऊं दे (म्ह० निष्फल होऊं दे).

खडकीं जैसें वर्षलें । कां आगीमाजीं पेरिलें ।
कर्म मानीं देखिलें । स्वप्न जैसें ॥१३१॥

अन्वय--जैसें खडकीं वर्षलें[1], कां आगीमाजीं पेरिलें, (कां) जैसें स्वप्न देखिलें (तैसें) कर्म मानीं.

अर्थ--ज्याप्रमाणें खडकावर वृष्टी[1] झाली[1], अथवा अग्निमध्यें (बीं) पेरलें (अथवा) ज्याप्रमाणें स्वप्न पाहिलें (त्याप्रमाणें) कर्म (व्यर्थ अर्थात् निष्फल) समज.

अगा आत्मजेच्या विषीं । जिवु जैसा निरभिलाषी ।
तैसा कर्मीं अशेषीं । निष्कामु होईं ॥१३२॥

अन्वय--अगा, जैसा जिवु आत्मजेच्या विषीं निरभिलाषी, तैसा अशेषीं कर्मीं[1] निष्कामु होईं.

अर्थ--अरे (अर्जुना), ज्याप्रमाणें (बापाचा) जीव (म्ह० मन) मुलीच्या संबंधानें कामनारहित (असतो), त्याप्रमाणें सर्व कर्मांच्या[1] ठिकाणीं[1] (तूं) निरिच्छ हो.

वन्हीची ज्वाळा जैशी । वायां जाय आकाशीं ।
क्रिया जिरों दे तैसी । शून्यामाजीं ॥१३३॥

अन्वय-- जैशी वन्हीची ज्वाळा आकाशीं वायां जाय, तैसी क्रिया शून्यामाजीं जिरों[1] दे[1].

अर्थ--ज्याप्रमाणें अग्नीची ज्वाळा आकाशांत व्यर्थ जाते, त्याप्रमाणें

( तुझें ) कर्म आकाशामध्यें विलीन[१] ( नष्ट ) होऊं[१] दे[१] ( म्ह० निष्फळ होऊं दे ).

अर्जुना हा फलत्यागु । आवडे कीर असलगु ।
परि योगामाजीं योगु । धुरेचा हा ॥१३४॥

**अन्वय**—अर्जुना, हा फलत्यागु असलगु कीर आवडे, परि हा योगु योगामाजीं धुरेचा.

**अर्थ**—अर्जुना, हा कर्मफलत्याग सोपा खरोखर वाटतो, परंतु हा योग ( सर्व ) योगांमध्यें अग्रगण्य ( आहे ).

येणें फलत्यागें सांडे । तें तें कर्म न विरूढे ।
एकचि वेळें वेळुझाडें । वांझें जैसीं ॥१३५॥

**अन्वय**—येणें फलत्यागें (जें जें) कर्म सांडे[१], तें तें (तैसें) न[२] विरूढे[२], जैसीं वेळुझाडें[३] एकचि वेळें ( विऊनी ) वांझें ( होतीं ).

**अर्थ**—या फलत्यागानें (जें जें) कर्म टाकलें[१] जातें[१] ( शब्दशः—टाकतो ) तें तें ( कर्म ) ( तसें ) वाढीला[२] लागत[२] नाहीं[२] ( म्ह० निष्फळ होतें ) जशीं वेळूचीं[३] झाडें[३] एकच वेळ (व्याल्यानंतर कायमचीं) फलशून्य (होतात).

तैसें येणेंचि शरीरें । शरीरा येणें सरे ।
किंबहुना येरझारे । चिरा पडे ॥१३६॥

**अन्वय**—तैसें येणेंचि शरीरें शरीरा येणें सरे, किंबहुना[१] येरझारे चिरा पडे.

**अर्थ**—त्याप्रमाणें याच शरीरानें शरीराला येणें ( म्ह० पुन्हां जन्माला येणें ) संपतें, फार[१] काय[१] सांगावें[१], ( जन्ममृत्युरूप ) येण्याजाण्यावर दगड पडतो ( म्ह० जन्ममृत्यूचे फेरे कायमचे बंद पडतात ).

पैं अभ्यासाचियां पाउटीं । ठाकिजे ज्ञान किरीटी ।
ज्ञानें येइजे भेटी । ध्यानाचिये ॥१३७॥

**अन्वय**—किरीटी, अभ्यासाचियां पाउटीं ज्ञान ठाकिजे[१], ज्ञानें ध्यानाचिये भेटी येइजे.

**अर्थ**—अर्जुना, अभ्यासाच्या पायरीनें ज्ञान ( म्ह० परोक्षज्ञान ) प्राप्त[1] करून[1] घेण्यांत[1] येतें[1] ( अर्थात् प्राप्त होतें ), ( आणि ) ज्ञानानें ध्यानाच्या भेटीला यावें ( म्ह० ध्यानाची प्राप्ति होते ).

मग ध्यानासि खेंव । देती आघवेचि भाव ।
तेव्हां कर्मजात सर्व । दूरी ठाके ॥१३८॥

**अन्वय**—मग ( जेव्हां ) आघवेचि भाव ध्यानासि खेंव देती, तेव्हां सर्व कर्मजात दूरी ठाके.

**अर्थ**—नंतर ( ज्यावेळीं ) सर्वच मनोवृत्ति ध्यानाला आलिंगन देतात ( म्ह० लीन होतात ) त्यावेळीं सर्व कर्मसमुदाय बाजूला राहतो ( म्ह० थांवतो ).

कर्म जेथ दुरावे । तेथ फलत्यागु संभवे ।
त्यागास्तव आंगवे । शांति सगळी ॥१३९॥

**अन्वय**—जेथ[1] कर्म दुरावे[2], तेथ[3] फलत्यागु संभवे[4], त्यागास्तव सगळी शांति आंगवे[5].

**अर्थ**—ज्या[1] ठिकाणीं[1] कर्म दूर[2] रहातें[2] ( म्ह० घडत नाहीं अर्थात् थांबतें ) त्या[3] ठिकाणीं[3] फलत्याग उत्पन्न[4] होतो[4] ( म्ह० आपोआप घडतो ); ( आणि ) फलत्यागामुळें संपूर्ण ब्रह्मस्थिति स्वाधीन[5] ( प्राप्त ) होते[5].

म्हणोनि यावया शांति । हाचि अनुक्रमु सुभद्रापती ।
म्हणोनि अभ्यासुचि प्रस्तुतीं । करणें एथ ॥१४०॥

**अन्वय**—सुभद्रापती, म्हणोनि शांति यावया[1] हाचि अनुक्रमु ( असे ) म्हणोनि एथ[2] प्रस्तुतीं अभ्यासुचि करणें.

**अर्थ**—अर्जुना, म्हणून ब्रह्म प्राप्त[1] होण्याकरितां[1] हाच क्रम ( आहे ); एवढ्याकरितां या[2] ठिकाणीं[2] सांप्रत अभ्यासच करणें ( तुला योग्य आहे ).

अभ्यासाहूनि गहन । पार्था मग ज्ञान ।
ज्ञानापासोनि ध्यान । विशेषिजे ॥१४१॥

**अन्वय**—पार्था, अभ्यासाहूनि ज्ञान गहन ( असे ), मग ज्ञानापासोनि ध्यान विशेषिजे[1].

**अर्थ**—अर्जुना, अभ्यासापेक्षां ज्ञान कठिण ( आहे ), ( आणि ) ज्ञानापेक्षां ध्यान श्रेष्ठ[1] मानलें[1] जातें[1].

**श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ।**
**ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छान्तिरनन्तरम् ॥१२॥**

मग कर्मफलत्यागु । तो ध्यानापासोनि चांगु ।
त्यागाहूनि भोगु । शांतिसुखाचा ॥१४२॥

**अन्वय**—मग कर्मफलत्यागु तो ध्यानापासोनि चांगु ( असे ), त्यागाहूनि शांतिसुखाचा भोगु ( चांगु असे ).

**अर्थ**—मग कर्मफलत्याग हा ध्यानापेक्षां चांगला ( आहे ), ( आणि ) कर्मफलत्यागापेक्षां ब्रह्मसुखाचा अनुभव ( श्रेष्ठ आहे ).

ऐसिया या वाटा । इहींचि पेणां सुभटा
शांतीचा माजिवटा । ठाकिला जेणे ॥१४३॥

**अन्वय**—सुभटा, ऐसिया या वाटा, इहींचि पेणां जेणे शांतीचा माजिवटा ठाकिला[1].

**अर्थ**—सुवीरा (अर्जुना), अशा या मार्गानें, ( त्यांतील वर सांगितलेल्या) ह्याच टप्प्यांनीं ज्यानें शांतीचा गाभा प्राप्त[1] करून[1] घेतला[1].

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।**
**निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥१३॥**

जो सर्व भूतांच्या ठायीं । द्वेषातें नेणेचि कहीं ।
आपपरु नाहीं । चैतन्या जैसा ॥१४४॥

**अन्वय**—जो सर्व भूतांच्या ठायीं द्वेषातें कहीं नेणेचि[1], जैसा चैतन्या आपपरु[2] नाहीं ( तैसा जया नाहीं ).

**अर्थ**—जो सर्व प्राण्यांच्या ठिकाणीं द्वेषाला कधींहि जाणतच[1] नाहीं[1], ज्याप्रमाणें चैतन्याला " ( हा ) आपला[2] ( व हा ) दुसऱ्याचा[2] " असा[2] भेद[2] नाहीं ( त्याप्रमाणें ज्याला आपपरभाव नसतो) .

उत्तमातें धरिजे । अधमातें अव्हेरिजे ।
हें कांहींच नेणिजे । वसुधा जेवीं ॥ १४५ ॥

**अन्वय**—उत्तमातें धरिजे[1], अधमातें अव्हेरिजे[2] हें कांहींच जेवीं वसुधा नेणिजे[3].

**अर्थ**—चांगल्याला धारण[1] करावें[1] (व) नीचाला टाकून[2] द्यावें[2], हें मुळींच ज्याप्रमाणें पृथ्वी जाणत[3] नाहीं[3] (शब्दशः—पृथ्वीकडून जाणलें जात नाहीं).

कां रायाचे देह चाळूं । रंका परौतें गाळूं ।
हें न म्हणेचि कृपाळु । प्राणु पैं गा ॥ १४६ ॥

**अन्वय**—गा (अर्जुना), कां रायाचे देह चाळूं (आणि) रंका परौतें गाळूं, हें कृपाळू प्राणु न म्हणेचि.

**अर्थ**—अरे (अर्जुना), अथवा राजाचें शरीर (तेवढें मीं) वागवावें (आणि) दरिद्र्याला पलीकडे (बाजूस) टाकावें, असें दयाळू प्राण म्हणतच नाहीं (अर्थात् जाणतच नाहीं).

गाईची तृषा हरूं । कां व्याघ्रा विष होऊनि मारूं ।
ऐसें नेणेचि का करूं । तोय जैसें ॥ १४७ ॥

**अन्वय**—गाईची तृषा हरूं[1], कां व्याघ्रा विष होऊनि मारूं, ऐसें करूं जैसें तोय नेणेचि[2].

**अर्थ**—गाईची तहान (मी) नाहींशी[1] करीन[1], अथवा वाघाला (मात्र) विष होऊन मारीन, असें करण्यास जसें पाणी जाणतच[2] नाहीं[2].

तैसी आघवियांचि भूतमात्रीं । एकपणें जया मैत्री ।
कृपेशीं धात्री । आपणचि जो ॥ १४८ ॥

**अन्वय**—तैसी एकपणें[1] आघवियांचि भूतमात्रीं[2] जया मैत्री (असे) जो आपणचि कृपेशीं धात्री (असे).

**अर्थ**—त्याप्रमाणें एकपणाच्या[1] बोधानें[1] सर्व प्राणिमात्रांचें[2] ठिकाणीं[2] ज्याचा स्नेह (असतो), जो स्वतःच कृपेची जन्मभूमि (उत्पत्तिस्थान)

( असतो ).

आणि मी तूं हे भाष नेणे । माझें कांहींचि न म्हणे ।
सुख दुःख जाणणें । नाहीं जया ॥ १४९॥

**अन्वय**—आणि मी तूं हे भाष नेणे[1], ( जो ) कांहींचि[2] माझें न म्हणे, जया सुख दुःख जाणणें नाहीं.

**अर्थ**—आणि ( जो ) मी तूं ही भाषा जाणत[1] नाहीं[1]; ( जो ) कोणतीहि[2] वस्तु[2] ' माझी ' ( असें ) म्हणत नाहीं. ज्याला सुखाची ( व ) दुःखाची जाणीव नसते.

तेवींची क्षमेलागीं । पृथ्वीसि पवाडु आंगीं ।
संतोषा उत्संगीं । दिधलें घर ॥ १५०॥

**अन्वय**—तेवींचि क्षमेलागीं ( जया ) आंगीं[1] पृथ्वीसि पवाडु ( असे ) संतोषा ( जेणें ) उत्संगीं घर दिधलें.

**अर्थ**—तसेंच सहनशीलतेसंबंधीं ( ज्याच्या ) स्वतःचे[1] ठिकाणीं[1] पृथ्वीची थोरवी ( म्ह० योग्यता ) ( असते ), ( आणि ) तृप्तीला ( ज्यानें आपल्या ) मांडीवर स्थान दिलें ( म्ह० आश्रय दिला आहे ).

**संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १४॥**

वार्षियेवीण सागरु । जैसा जळें नित्य निर्भरु ।
तैसा निरुपचारु । संतोषी जो ॥ १५१॥

**अन्वय**—जैसा वार्षियेवीण सागरु जळें नित्य निर्भरु[1] ( असे ), तैसा जो निरुपचारु संतोषी ( असे ).

**अर्थ**—ज्याप्रमाणें वर्षाऋतुशिवाय ( अर्थात् पावसाळ्याविना ) समुद्र पाण्यानें नेहमीं पूर्ण[1] भरलेला[1] ( असतो ), त्याप्रमाणें जो निर्निमित्त ( अर्थात् बाह्य सुखसाधनांवाचून ) आनंदी ( असतो ).

वाहूनि आपुली आण । धरी जो अंतःकरण ।
निश्चया साचपण । जयाचेनि ॥ १५२॥

**अन्वय**--जो आपुली आण वाहूनि अंतःकरण धरी[१], जयाचेनि निश्चया साचपण ( असे ).

**अर्थ**--जो आपली शपथ घालून अंतःकरण ताब्यांत[१] ठेवतो[१], (आणि) ज्याच्यामुळें निश्चयाला खरेपणा ( असतो ).

जीवु परमात्मा दोन्ही । बैसले ऐक्यासनीं ।
जयाचिया हृदयभुवनीं । विराजती ॥१५३॥

**अन्वय**--जयाचिया हृदयभुवनीं[१] जीवु परमात्मा दोन्ही ऐक्यासनीं[१] बैसले विराजती[२].

**अर्थ**--ज्याच्या अंतःकरणरूपी[१] घरांत[१] जीवात्मा ( व ) परमात्मा ( असे ) दोघे ऐक्यरूपी[१] आसनावर[१] बसलेले शोभत[२] आहेत[२] ( म्ह० ज्याच्या ठिकाणीं जीवशिवाचें ऐक्य झालेलें आहे ).

ऐसा योगसमृद्धी । होऊनि जो निरवधि ।
अर्पी मनोबुद्धि । माझ्या ठायीं ॥१५४॥

**अन्वय**--योगसमृद्धी[१] ऐसा[२] होऊनि जो मनोबुद्धि[३] माझ्या ठायीं निरवधि अर्पी[४].

**अर्थ**--ऐक्यरूपी[१] योगाच्या[१] उत्कटतेनें[१] अशा[२] प्रकारचा[२] होऊन जो मन[३] ( व ) बुद्धि[३] माझ्या ठिकाणीं अखंड अर्पण[४] करतो[४].

आंतु बाहेरि योगु । निर्वाळलेयाही चांगु ।
तरि माझा अनुरागु । सप्रेम जया ॥१५५॥

**अन्वय**--( जरि ) आंतु बाहेरी योगु चांगु[१] निर्वाळलेयाहि[२] तरि जया माझा सप्रेम अनुरागु ( असे ).

**अर्थ**--( जरि ) आंत ( व ) बाहेर योग चांगल्या[१] प्रकारें[१] शुद्ध[२] बाणलेला[२] असला[२] तरी ज्याला माझी प्रेमपूर्वक निष्ठा ( असते ).

अर्जुना गा तो भक्तु । तोचि योगी तोचि मुक्तु ।
तो वल्लभा मी कांतु । ऐसा पढिये ॥१५६॥

**अन्वय**--गा अर्जुना, तो भक्तु, तोचि योगी, तोचि मुक्तु; तो वल्लभा[१]

मी कांतु, ऐसा पढिये.

**अर्थ**--अरे अर्जुना, तो भक्त, तोच योगी ( व ) तोच मुक्त ( होय ) ' तो आवडती[1] पत्नी ( व ) मी पती, असा ( तो मला ) आवडतो. '

हें ना तो आवडे । मज जीवाचेनि पाडें ।
हेंही एथ थोकुडें । रूप करणें ॥१५७॥

**अन्वय**--हें ना, तो मज जीवाचेनि पाडें आवडे, हेंहि रूप करणें एथ थोकडें ( असे ).

**अर्थ**--एवढेंच नाहीं, तो मला जिवाच्या बरोबरीनें ( म्ह० जिवासारखा ) आवडतो, हेंसुद्धां वर्णन करणें याठिकाणीं कोतें ( पडतें ).

तरि पढियंतेयाची कहाणी । हे भुलीची भारणी ।
इये तंव न बोलणीं । परि बोलवी श्रद्धा ॥१५८॥

**अन्वय**--तरि पढियंतेयाची कहाणी, हे भुलीची[1] भारणी ( असे ), इये तंव न[2] बोलणीं[2], परि श्रद्धा बोलवी[3].

**अर्थ**--तथापि लाडक्याची कथा ( सांगणें ) ही भुरळ[1] ( म्ह० मोह ) पाडणारी[1] मोहनी ( आहे ); ह्या तर बोलण्यासारख्या[2] गोष्टी[2] नाहींत[2], परंतु ( तुझें ) प्रेम ( मला या गोष्टी ) बोलावयास[3] लावतें[3].

म्हणोनि गा आम्हां । वेगा आली उपमा ।
एऱ्हवीं काय प्रेमा । अनुवादु असे ॥१५९॥

**अन्वय**--गा ( अर्जुना ), म्हणोनि आम्हां उपमा वेगा आली, एऱ्हवीं प्रेमा काय अनुवादु असे.

**अर्थ**--अरे ( अर्जुना ), म्हणून आम्हांला ( हा ) दृष्टान्त चटकन सुचला; नाहींतर ( या ) प्रेमाला काय बोलणें असतें.

आतां असो हें किरीटी । पैं प्रियाचिया गोष्टी ।
दुणा थांव उठी । आवडी गा ॥१६०॥

**अन्वय**--गा किरीटी, आता हे असो[1], प्रियाचिया गोष्टी आवडी दुणा थांव उठी.

**अर्थ**--अरे अर्जुना, आतां हें असूं[1] दे; प्रियकराच्या गोष्टीनें प्रेमाला दुप्पट वळ चढतें.

तयाही वरी विपायें । प्रेमळु संवादिया होये ।
तिये गोडीसी आहे । कांटाळें मग ॥१६१॥

**अन्वय**--तयाही वरी, विपायें प्रेमळु संवादिया[1] होये, मग तिये गोडीसी कांटाळें आहे.

**अर्थ**--त्यांतही अधिक, कदाचित् प्रेमळ चर्चा[1] करणारा[1] ( एखादा ) मिळाला, तर त्या गोडीला माप आहे ( काय ) ?

म्हणोनि गा पांडुसुता । तूंचि प्रियु आणि तूंचि श्रोता ।
वरि प्रियाची वार्ता । प्रसंगें आली ॥१६२॥

**अन्वय**--गा पांडुसुता, म्हणोनि तूंचि प्रियु आणि तूंचि श्रोता, वरि प्रसंगें प्रियाची वार्ता आली.

**अर्थ**--अरे अर्जुना, म्हणून तूंच आवडता आणि तूंच श्रोता, आणखी ( या ) प्रसंगानें प्रेमळाचीच गोष्ट निघाली ( म्ह० बोलण्याचा विषय झाली ).

तरि आतां बोलों । भलेया सुखा मीनलों ।
ऐसें म्हणतखेंवीं डोलों । लागले देवो ॥१६३॥

**अन्वय**--तरि आतां बोलों, भलेया सुखा मीनलों[1], ऐसें म्हणतखेंवीं देवो डोलों लागले.

**अर्थ**--तर आतां ( आम्ही ) बोलतों; 'मोठ्या आनंदाला ( आम्ही ) प्राप्त[1] झालों[1] ( आहोंत )', असें म्हणतांक्षणींच देव डोलूं लागले.

मग म्हणे जाण । तया भक्ताचें लक्षण ।
जया मी अंतःकरण । बैसों घालीं ॥१६४॥

**अन्वय**--मग म्हणे, जया मी ( आपुलें ) अंतःकरण बैसों घालीं, तया भक्ताचें लक्षण जाण[1].

**अर्थ**-- मग म्हणाले, "ज्याला मी ( आपलें ) हृदय बसावयास घालतों; त्या भक्ताचें चिन्ह समजून[1] घे[1]."

यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।
हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥१५॥

तरि सिंधूचेनि माजें । जळचरां भय नुपजे ।
आणि जळचरीं नुबुजे । समुद्रु जैसा ॥१६५॥

**अन्वय**—तरि जैसा सिंधूचेनि माजें जळचरां[1] भय नुपजे[2], आणि जळचरीं समुद्र नुबुजे[3].

**अर्थ**—तर ज्याप्रमाणें समुद्राच्या भरतीनें पाण्यांतील[1] प्राण्यांना[1] भय उत्पन्न[2] होत[2] नाहीं[2] ( म्ह० वाटत नाहीं ), आणि जळचरांमुळें समुद्र घाबरत[3] नाहीं[3].

तेविं उन्मत्तें जगें । जयासि खंती न लगे ।
आणि जयाचेनि आंगें । न शिणे लोकु ॥१६६॥

**अन्वय**—तेविं जयासि उन्मत्तें जगें खंती न लगे, आणि जयाचेनि आंगें लोकु न[1] शिणे[1].

**अर्थ**—त्याप्रमाणें ज्याला मस्त जगामुळें ( म्ह० लोकांमुळें ) खेद होत नाहीं, आणि ज्याच्या योगानें लोकांना त्रास होत[1] नाहीं[1].

किंवहुना पांडवा । शरीर जैसें अवयवां ।
तैसा नुबगे जीवां । जीवपणें जो ॥१६७॥

**अन्वय**—पांडवा, किंबहुना[1], जैसें शरीर अवयवां नुबगे[2], तैसा जो जीवपणें जीवां ( नुबगे ).

**अर्थ**—अर्जुना, फार[1] काय[1] सांगावें[1], ज्याप्रमाणें शरीर ( आपल्या ) अवयवांना कंटाळत[2] नाहीं[2], त्याप्रमाणें जो जीवपणानें ( म्ह० आपणच सर्वांचा प्राण असल्यामुळें अर्थात् भूतात्मभावामुळें ) प्राण्यांना ( कंटाळत नाहीं ).

जगचि देह जाहलें । म्हणोनि प्रियाप्रिय गेलें ।
हर्षामर्ष ठेले । दुजेनविण ॥१६८॥

**अन्वय**—जगचि देह जाहलें, म्हणोनि प्रियाप्रिय[1] गेलें[2] ( आणि ) दुजे-

नविण हर्षामर्ष[३] ठेले.

**अर्थ**——जगच (ज्याचें) शरीर झालें (व) म्हणून (अमुक) आवडतें[१] (व) (अमुक) नावडतें (हें) नष्ट[२] झालें[२]; (आणि) दुसऱ्यावांचून (म्ह० द्वैताभावामुळें) आनंद[३] (व) क्रोध[३] (हेहि) (ज्याच्या ठिकाणीं) लोपले (म्ह० नष्ट झाले).

ऐसा द्वंद्वनिर्मुक्तु । भयोद्वेगरहितु ।
याही वरि भक्तु । माझ्या ठायीं ॥१६९॥

**अन्वय**——ऐसा द्वंद्वनिर्मुक्तु[१] भयोद्वेगरहितु[२] याही वरि माझ्या ठायीं भक्तु[३] (असे).

**अर्थ**——असा (सुखदुःखादि) द्वंद्वांपलीकडे[१] असलेला[१] (व) भय[२] (आणि) खिन्नता[२] यांपासून[२] मुक्त[२] (आणि) यांच्याहि भरतीला (म्ह० इतकें असून शिवाय) माझ्या ठिकाणीं (जो) भक्ति[३] करणारा[३] (असतो).

तरि तयाचा गा मज मोहो । काय सांगों तो पढियावो ।
हें असो जीवें जीवो । माझेनि तो ॥१७०॥

**अन्वय**——गा, तरि मज तयाचा मोहो (असे), तो पढियावो काय सांगों, हें असो[१], तो माझेनि जीवें जीवो[२].

**अर्थ**——अरे (अर्जुना), म्हणून मला त्याची माया (असते), ती आवड काय सांगूं ! हें राहूं[१] दे[१]. तो माझ्या प्राणानेंच जिवंत[२] राहो[२] (म्ह० माझ्या जीवाचा तो जीवच आहे).

जो निजानंदें धाला । परिणामु आयुष्या आला ।
पूर्णते जाहला । वल्लभु जो ॥१७१॥

**अन्वय**——जो निजानंदें धाला[१], परिणामु आयुष्या आला, (जो) पूर्णते वल्लभु जाहला.

**अर्थ**——जो आत्मानंदानें तृप्त[१] झाला[१], ब्रह्मच (ज्याच्या रूपानें) जन्मास आलें (आहे), जो पूर्णावस्थेचा प्रियपति झाला.

**अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।**
**सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १६ ॥**

जयाचिया ठायीं पांडवा । अपेक्षे नाहीं रिगावा ।
सुखासि चढावा । जयाचें असणें ॥१७२॥

**अन्वय**--पांडवा, जयाचिया ठायीं अपेक्षे रिगावा नाहीं, जयाचें असणें सुखासि चढावा ( असे ).

**अर्थ**--अर्जुना, ज्याच्या ठिकाणीं इच्छेचा प्रवेश नसतो, ज्याचें अस्तित्व ( म्हणजे ) सुखाची वाढ ( होय ).

मोक्ष देऊनि उदार । काशी होय कीर ।
परि वेंचणें लागे शरीर । तिये गांवीं ॥१७३॥

**अन्वय**--काशी मोक्ष देऊनि उदार होय कीर, परि तिये गांवीं शरीर वेंचणें लागे.

**अर्थ**--काशी मोक्ष देण्यांत ( देण्याइतकी ) उदार असते खरी, परंतु त्या गांवांत ( म्ह० काशींत ) शरीर वेंचावें लागतें ( म्ह० मरावें लागतें ).

हिमवंतु दोष खाये । परि जीविताची हानि होये ।
तैसें शुचित्व नोहे । सज्जनाचें ॥१७४॥

**अन्वय**--हिमवंतु दोष खाये[१], परि जीविताची हानि होये, तैसें सज्जनाचें शुचित्व नोहे.

**अर्थ**--हिमालय पाप नाहींसें[१] करतो[१], परंतु ( त्यांत ) प्राणाचाहि नाश होतो; त्याप्रकारचा साधूचा पवित्रपणा नसतो.

शुचित्वें शुचि गांग होये । आणि पाप तापही जाये ।
परि तेथें आहे । बुडणें एक ॥१७५॥

**अन्वय**--गांग[१] शुचित्वें शुचि होये, आणि ( तेणें ) पाप तापही जाये[२] परी तेथें[३] बुडणें[४] एक आहे.

**अर्थ**--गंगेचें[१] पाणी[१] ( आंगच्या ) पवित्रपणामुळें पवित्र असतें, आणि ( म्हणून ) ( त्याचे योगानें ) पाप ( व त्रिविध ) तापसुद्धां नाहींसे[२] होतात[२]; परंतु त्या[३] ठिकाणीं[३] देह[४] टाकणें[४] ( म्ह० बुडून मरणें ) ( ही ) एक ( गोष्ट आवश्यक ) असते.

खोलिये पारु नेणिजे । तरी भक्तीं न बुडिजे ।
रोकडाचि लाहिजे । न मरतां मोक्षु ॥१७६॥

**अन्वय**—भक्तीं[1] खोलिये पारु नेणिजे[1], तरी न बुडिजे, न मरतां मोक्षु रोकडाचि लाहिजे[3].

**अर्थ**—भक्ताच्या[1] ठिकाणीं[1] खोलीचा (गांभीर्यांचा) अंत समजत[2] नाहीं.[2] तरी (त्याचा उपासक) बुडत नाहीं (आणि त्याला) न मरतां (म्ह० जिवंतपणींच) मोक्ष प्रत्यक्ष प्राप्त[3] होतो[3].

संताचेनि अंगल्गें । पापातें जिणणें गंगे ।
तेणें संतसंगें । शुचित्व कैसें ॥१७७॥

**अन्वय**—संताचेनि अंगलगें गंगे पापातें जिणणें[1] तेणें संतसंगें शुचित्व कैसें ?

**अर्थ**—संताच्या शरीरस्पर्शानें गंगेकडून पापाला जिंकलें[1] जातें[1] (शब्दशः—जिंकणें होतें) त्या संतसंगतीनें (येणारें) पावित्र्य कसें (उच्च प्रतीचें असेल) ?

म्हणोनि असो जो ऐसा । शुचित्वें तीर्थां कुवासा ।
जेणें उल्लंघविले दिशा । मनोमळ ॥१७८॥

**अन्वय**—म्हणोनि असो[1], ऐसा[2] जो शुचित्वें तीर्थां कुवासा (असे) जेणें मनोमळ[3] दिशा उलंघविले[4].

**अर्थ**—म्हणून राहूं[1] दे[1], अशा[2] प्रकारचा[2] जो (भक्त) पावित्र्यामुळें तीर्थांना आश्रय (असतो), (आणि) ज्यानें मनांतील[3] पातकांना[3] दिशांच्या पलीकडे[4] पळवून[4] लाविलें[4].

आंतु बाहेरि चोखाळु । सूर्य जैसा निर्मळु ।
आणि तत्त्वार्थींचा पायाळू । देखणा जो ॥१७९॥

**अन्वय**—जैसा सूर्य आंतु बाहेरि निर्मळु (तैसा जो) आतु बाहेरि चोखाळु (असे) आणि जो तत्त्वार्थींचा[1] पायाळु देखणा (असे).

**अर्थ**—जसा सूर्य आंत बाहेर शुद्ध (असतो) (त्याप्रमाणें जो मनानें

व शरीरानें ) शुद्ध ( असतो ); आणि जो ब्रह्मरूपी ( भूमिगत ) धनाचा[१] पायाळू ( मनुष्याप्रमाणें ) पाहणारा ( असतो ).

व्यापक आणि उदास । जैसें कां आकाश ।
तैसें जयाचें मानस । सर्वत्र गा ॥१८०॥

**अन्वय**--गा ( अर्जुना ), आकाश जैसें व्यापक आणि उदास, तैसें जयाचें मानस सर्वत्र ( व्यापक आणि उदास असे ).

**अर्थ**— अरे ( अर्जुना ), आकाश ज्याप्रमाणें सर्वव्यापी असूनहि आलिप्त ( असतें ) त्याप्रमाणें ज्याचें मन सर्वत्र ( आत्मभाव बाळगूनहिं निरपेक्ष असतें ).

संसारव्यथे फिटला । जो नैराश्यें विनटला ।
व्याधाहातोनि सुटला । विहंगु जैसा ॥१८१॥

**अन्वय**--जो नैराश्यें विनटला[१] ( म्हणूनि ) संसारव्यथे फिटला[२]; जैसा व्याधाहातोनि[३] सुटला विहंगु-

**अर्थ**--जो निरिच्छतेनें भूषित[१] झाला[१] ( सिद्ध झाला ) ( म्हणून ) संसारक्लेशांतून मुक्त[२] झाला[२]; ज्याप्रमाणें पारध्याच्या[३] हातून[३] सुटलेला पक्षी- ( दुःखमुक्त होऊन आनंदी होतो तसा तो झाला ).

तैसा सतत जो सुखे । कोणींही टवंच न देखे ।
नेणिजे गतायुषें । लज्जा जेवीं ॥१८२॥

**अन्वय**—तैसा सतत जो सुखे[१], जेवीं गतायुषें[२] लज्जा नेणिजे[३] ( तेवीं जो ) कोणीहि टवंच[३] न देखे.

**अर्थ**--त्याप्रमाणें नेहमीं जो सुखी[१] असतो[१]; ज्याप्रमाणें मेलेला[२] मनुष्य[२] लाज जाणत[३] नाहीं[३]. ( त्याप्रमाणें जो ) कसलेंही मानसिक[३] दुःख[३] जाणत नाहीं.

आणि कर्मारंभालागीं । जया अहंकृतीं नाहीं आंगीं ।
जैसा निरिंधन आगी । विझोनि जाय ॥१८३॥

**अन्वय**--आणि जया आंगीं कर्मारंभालागीं[१] अहंकृती नाहीं, जैसा

निरिंधन आगी विझोनि जाय.

अर्थ---आणि ज्याच्या ठिकाणीं कर्म[1] करण्याविषयीं[1] अहंकार नसतो, ज्याप्रमाणें काष्ठरहित अग्नि विझून जातो---

तैसा उपशमुचि भागा । जयासि आला पैं गा ।
जो मोक्षाचिया आंगा । लिहिला असे ॥१८४॥

अन्वय---गा ( अर्जुना ), तैसा उपशमुचि[1] जयासि भागा आला; जो ( उपशमु ) मोक्षाचिया आंगा लिहिला असे.

अर्थ---अरे ( अर्जुना ), त्याप्रमाणें ( अहंकाराच्या अभावामुळें ) मनाची[1] शांतिच[1] ज्याच्या वाट्याला आली ( आहे ); जी ( शांति ) मोक्षाच्या खात्याला ( बाजूला ) लिहिलेली असते ( म्ह० जिनें मोक्ष निश्चित मिळतो ).

अर्जुना हा ठावोवरी । सोहंभावो सरोभरी ।
द्वैताच्या पैल्तीरीं । निगों सरला ॥१८५॥

अन्वय---अर्जुना, हा ठावोवरी सोहंभावो सरोभरी[1] द्वैताच्या पैल-तीरीं[2] निगों सरला[3].

अर्थ---अर्जुना, या मर्यादेपर्यंत ( येण्याइतका ) सोहंभाव ( म्ह० ब्रह्मैक्य-भाव ) ( अंगांत ) पूर्ण[1] भरल्यामुळें[1] ( तो ) द्वैताच्या पलीकडील[2] तीरावर[2] उतरण्यास समर्थ[3] झाला[3].

कीं भक्तिसुखालागीं । आपणपेंचि दोहीं भागीं ।
वांटूनिया आंगीं । सेवकै वाणी ॥१८६॥

अन्वय---कीं भक्तिसुखालागीं आपणपेंचि दोहीं भागीं वांटूनिया आंगीं[1] सेवकै वाणी[2].

अर्थ--- तथापि भक्तिसुखाकरितां आपणालाच दोन ( म्ह० देव व भक्त अशा ) भागांत वाटून आपल्या[1] ( भागाचे ) ठिकाणीं[1] सेवकपणा धारण[2] करतो[2].

येरा नाम मी ठेवी । मग भजती वोज बरवी ।
न भजतया दावी । योगिया जो ॥१८७॥

**अन्वय**—येरा ( भागा ) मी नाम ठेवी ( आणि ) मग जो न भजतया योगिया भजती बरवी वोज दावी.

**अर्थ**—दुसऱ्या ( भागाला ) मी ( म्ह० कृष्ण अर्थात् देव असें ) नांव ठेवतो ( आणि ) नंतर जो न भजणाऱ्या ( म्ह० भक्ति न करणाऱ्या ) योग्याला भजनाची ( भक्ति करण्याची ) चांगली रीत दाखवितो.

तयाचें आम्हां व्यसन । आमुचें तो निजध्यान ।
किंबहुना समाधान । तो मिळे तैं ॥ १८८ ॥

**अन्वय**—आम्हां तयाचें व्यसन, तो आमुचें निजध्यान[1], किंबहुना[2] ( जैं ) तो मिळे तैं समाधान ( असें ).

**अर्थ**—आम्हांला त्याचा छंद ( असतो ), तो आमचा स्वतःच्या[1] ध्यानाचा[1] विषय[1] ( असतो ), फार[2] काय[2] सांगावें[2], ( जेव्हां ) तो भेटतो तेव्हांच ( आमच्या मनाला ) समाधान ( होतें ).

तयालागीं मज रूपा येणें । तयाचेनि मज एथें असणें ।
तया लोण कीजे जीवें प्राणें । ऐसा पढिये ॥ १८९ ॥

**अन्वय**—मज तयालागीं रूपा येणें[1], तयाचेनि मज एथें असणें[2], तया जीवें प्राणें लोण कीजे, ऐसा पढिये.

**अर्थ**—मला त्याच्याकरितां ( सगुण—साकार ) रूपाला यावें[1] लागतें[1] ( म्ह० अवतार घ्यावा लागतो ), त्याच्यामुळें मला येथें ( म्ह० पृथ्वीवर ) राहावें[2] लागतें[2], त्याच्यावरून जीव ( आणि ) प्राण उतरून ( ओवाळून ) टाकावे, इतका ( तो मला ) आवडतो.

**यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न कांक्षति ।**
**शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥ १७ ॥**

जो आत्मलाभासारिखें । गोमटें कांहींचि न देखे ।
म्हणोनि भोगविशेखें । हरिखेजेना ॥ १९० ॥

**अन्वय**—जो आत्मलाभासारिखें[1] कांहींचि गोमटें न देखे, म्हणोनि भोगविशेखें[2] हरिखेजेना[3].

**अर्थ**—जो ब्रह्मप्राप्तीच्या[1] तोडीचें[1] कांहींच चांगलें पाहत ( अर्थात् मानीत ) नाहीं, म्हणून ( जो ) भोगांच्या[2] आधिक्यानें[2] ( अथवा विशिष्ट भोगांनीं म्ह० श्रेष्ठ विषयसुखांनीं ) हुरळून[3] जात[3] नाहीं[3].

आपणचि विश्व जाहला । तरि भेदभावो सहजाचि गेला ।
म्हणोनि द्वेषु ठेला । जया पुरुषा ॥ १९१ ॥

**अन्वय**—आपणचि विश्व जाहला, तरि भेदभावो सहजाचि गेला[1], म्हणोनि जया पुरुषा द्वेषु ठेला.

**अर्थ**—स्वतःच जग बनला, म्हणून भिन्नत्वभावना ( म्ह० द्वैतबुद्धि ) आपोआपच नष्ट[1] झाली[1] ( व ) म्हणून ज्या पुरुषाचा द्वेष ( पूर्णपणें ) राहिला ( अर्थात् नष्ट झाला ).

पैं आपुलें जें साचें । तें कल्पांतींहि न वचे ।
हें जाणोनि गताचें । न शोची जो ॥ १९२ ॥

**अन्वय**—जें साचें आपुलें ( असे ), तें कल्पांतींही[1] न[2] वचे[2], हें जाणोनि जो गताचें न[3] शोची[3].

**अर्थ**—जें खरेंच आपुलें ( असतें ), तें कल्पाच्या[1] शेवटीं[1] सुद्धां[1] नष्ट[2] होत[2] नाहीं[2], असें जाणून ( म्ह० ध्यानीं घेऊन ) जो गेलेल्याचें दुःख[3] करीत[3] नाहीं[3].

आणि जयापरौतें कांहीं नाहीं । तें आपणपेंचि आपुल्या ठायीं ।
जाहला यालागीं जो कांहीं । आकांक्षी ना ॥ १९३ ॥

**अन्वय**—आणि जयापरौतें[1] कांहीं नाहीं, तें आपणपेंचि आपुल्या ठायीं जाहला, यालागीं जो कांहीं आकांक्षी[1] ना[1].

**अर्थ**— आणि ज्याच्या[1] पलीकडे[1] कांहींच ( श्रेष्ठ ) नाहीं, तें ( ब्रह्म ) आपणच ( म्ह० स्वतःच ) स्वतःच्याच ठिकाणीं ( जो ) झाला, ( व ) म्हणून जो कांहींच ( म्ह० कशाचीच ) इच्छा[1] करीत[1] नाहीं[1].

वोखटें कां गोमटें । हें कांहींचि तया नुमटे ।
रात्रिदिवस न घटे । सूर्यासि जेवीं ॥ १९४ ॥

**अन्वय**—जेवीं सूर्यासि रात्रिदिवस[1] न घटे, ( तेवीं ) तया वोखटें कां गोमटें हें कांहींचि नुमटे[2].

**अर्थ**—ज्याप्रमाणें सूर्याला रात्र[1] ( व ) दिवस[1] ( यांतलें कांहींच ) घडत नाहीं, (त्याप्रमाणें) त्याला ( म्ह० भक्ताला ) वाईट किंवा चांगलें हें कांहींच दिसत[2] नाहीं[2] ( म्ह० यांना तो भिन्नत्वानें पाहात नाहीं ).

ऐसा बोधुचि केवळु । जो होऊनि असे निष्कळु ।
त्याहीवरी भजनशीळु । माझ्या ठायीं ॥ १९५ ॥

**अन्वय**—ऐसा जो केवळु बोधुचि होऊनि निष्कळु असे, ( व ) त्याहीवरी[1] माझ्या ठायीं भजनशीळु ( असे ).

**अर्थ**—असा जो निखळ ज्ञानरूपच होऊन पूर्ण असतो, व त्यांत[1] आणखी[1] माझ्या ठिकाणीं भजनशील ( असतो ) ( म्ह० नित्य माझें भजन करतो ).

तरि तया ऐसें दुसरें । आम्हां पढियंतें सोयरें ।
नाहीं गा साचोकारें । तुझी आण ॥ १९६ ॥

**अन्वय**—गा ( अर्जुना ), तरि साचोकारें आम्हां तया ऐसें पढियंतें दुसरें सोयरें नाहीं, तुझी आण ( वाहतसें ).

**अर्थ**—अरे (अर्जुना), तरी खरोखर आम्हांला त्याच्या सारखा ( अर्थात् त्याच्या तोडीचा ) आवडता दुसरा नातलग नाहीं, तुझीच शपथ ( वाहतों ).

**समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।**
**शीतोष्णसुखदुःखेषु समः सङ्गविवर्जितः ॥ १८॥**

पार्था जयाचिया ठायीं । वैषम्याची वार्ता नाहीं ।
रिपुमित्रां दोहीं । सरिसा पाडु ॥ १९७ ॥

**अन्वय**—पार्था, जयाचिया ठायीं वैषम्याची वार्ता नाहीं, ( आणि ) रिपुमित्रां[1] दोहीं पाडु सरिसा ( असे ).

**अर्थ**—अर्जुना, ज्याच्या ठिकाणीं विषमतेची गोष्ट नसते, ( आणि ज्याच्या ठिकाणीं ) शत्रु[1] ( आणि ) मित्र[1] ( या ) दोघांची किंमत सारखीच ( असते ).

कां घरींचियां उजियेडु करावा । पारखियां आंधारु पाडावा ।
हें नेणेचि गा पांडवा । दीपु जैसा ॥ १९८ ॥

**अन्वय**—गा पांडवा, जैसा दीपु घरींचियां[1] उजियेडु करावा, कां पारखियां आंधारु पाडावा, हें नेणेचि[2].

**अर्थ**—अरे अर्जुना, ज्याप्रमाणें दिवा घरच्या[1] लोकांना[1] प्रकाश करावा, अथवा परकीयांना अंधार करावा, हें जाणतच[2] नाहीं[2].

जो खांडावया घावो घाली । कां लावणी जयानें केली ।
दोघां एकचि साउली । वृक्षु दे जैसा ॥ १९९ ॥

**अन्वय**--जैसा वृक्षु जो खांडावया घावो घाली, कां लावणी जयानें केली, ( यां ) दोघां एकचि साउली दे.

**अर्थ**--ज्याप्रमाणें झाड, जो तोडण्याकरितां प्रहार करितो, अथवा ( त्याची ) लागवड ज्यानें केली, ( अशा ) दोघांना सारखीच साउली देतें.

नातरी इक्षुदंडु । पाळितया गोडु ।
गाळितया कडु । नोहेचि जेवीं ॥ २०० ॥

**अन्वय**--नातरी जेवीं इक्षुदंडु पाळितया गोडु ( आणि ) गाळितया[1] कडु नोहेचि[2].

**अर्थ**--अथवा ज्याप्रमाणें ऊंस वाढविणाऱ्यास ( चवीला ) गोड ( व ) पिळून[1] काढणाऱ्यास[1] कडु होत[2] नाहीं[2].

अरिमित्रीं तैसा । अर्जुना जया भावो ऐसा ।
मानापमानीं सरिसा । होतु जाय ॥ २०१ ॥

**अन्वय**--अर्जुना, तैसा अरिमित्रीं[1] जया ऐसा भावो ( असे ), ( आणि ) मानापमानीं[2] ( जो ) सरिसा होतु जाय.

**अर्थ**--अर्जुना, तसाच शत्रुमित्रांच्या[1] ठिकाणीं[1] ज्याचा असा समभाव ( असतो ), ( आणि ) मान[2] ( व ) अपमानांचे[2] बाबतींत[2] जो सारखा होत जातो ( म्ह० सारखेच मानतो ).

तिहीं ऋतूं समान । जैसें कां गगन ।
तैसें एकचि मान । शीतोष्णीं जया ॥ २०२ ॥

**अन्वय**--जैसें गगन तिहीं ऋतूं समान ( असे ), तैसें जया शीतोष्णीं[1] एकचि मान ( असे ).

**अर्थ**--ज्याप्रमाणें आकाश तिन्हीं ऋतूंमध्यें सारखें ( असतें ), त्याप्रमाणें ज्याला थंड[1] ( व ) उष्ण[1] यांच्यासंबंधानें[1] एकच गणती ( म्ह० किंमत ) ( असते ).

दक्षिण उत्तर मारुता । मेरु जैसा पांडुसुता ।

तैसा सुखदुःखां प्राप्तां । मध्यस्थु जो ॥ २०३ ॥

**अन्वय**--पांडुसुता, जैसा मेरु दक्षिण उत्तर मारुता ( मध्यस्थु असे ), तैसा जो प्राप्तां[1] सुखदुःखां मध्यस्थु ( असे ).

**अर्थ**--अर्जुना, ज्याप्रमाणें मेरु ( पर्वत ) दक्षिण-उत्तर ( म्ह० दक्षिणेकडच्या व उत्तरेकडच्या ) वाऱ्याला ( वाऱ्याच्या बाबतींत ) ( उदासीन असतो ), त्याप्रमाणें जो प्राप्त[1] झालेल्या[1] सुखदुःखांविषयीं तटस्थ ( म्ह० उदासीन ) ( असतो ).

माधुर्यें चंद्रिका । सरिसी राया रंका ।
तैसा जो सकळिकां । भूतां समु ॥ २०४ ॥

**अन्वय**--( जैसी ) चंद्रिका माधुर्यें राया रंका सरिसी ( असे ), तैसा जो सकळिकां भूतां समु ( असे ).

**अर्थ**--( ज्याप्रमाणें ) चांदणें आल्हादकत्वानें राजाला ( व ) भिकाऱ्याला सारखेंच ( असतें ), त्याप्रमाणें जो सगळ्या प्राण्यांना सारखाच ( आल्हादकारक असतो ).

आघविया जगा एक । सेव्य जैसें उदक ।
तैसें तयातें तिन्ही लोक । आकांक्षिती ॥ २०५ ॥

**अन्वय**--जैसें उदक आघविया जगा एक सेव्य ( असे ), तैसें तयातें तिन्ही लोक आकांक्षिती[1].

**अर्थ**--ज्याप्रमाणें पाणी सर्व जगाला समान सेव्य ( म्ह० सेवन करण्यास योग्य वाटतें ), त्याप्रमाणें त्याची तिन्ही ( म्ह० स्वर्ग, मृत्यु, पाताळांतील ) लोक इच्छा[1] करतात[1].

जो सबाह्यसंगु । सांडोनियां लागु ।
एकाकी असे आंगु । आंगीं सूनी ॥२०६॥

**अन्वय**--जो सबाह्यसंगु लागु सांडोनियां ( आणि ) आंगीं आंगु सूनी एकाकी असे.

**अर्थ**--जो अंतर्बाह्यसंगाचा संबंध टाकून ( आणि ) आंगांत ( म्ह० ब्रह्मस्वरूपांत ) आंग ( म्ह० जीवात्मा ) घालून एकटा असतो.

**तुल्यनिन्दास्तुतिर्मौनी संतुष्टो येन केनचित् ।**

अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥१९॥

जो निंदेतें नेघे । स्तुति न श्लाघे ।
आकाशा न लगे । लेपु जैसा ॥२०७॥

**अन्वय**--जैसा आकाशा लेपु न लगे, (तैसा) जो निंदेतें नेघे[1] (आणि) स्तुति न श्लाघे.

**अर्थ**--ज्याप्रमाणें आकाशाला लेप लागत नाहीं ( त्याप्रमाणें ) जो निंदेला घेत[1] नाहीं[1] ( म्ह० निंदा मनावर घेत नाहीं ) ( आणि ) स्तुतीला वाखाणत नाहीं ( म्ह० स्तुतींत आनंद मानीत नाहीं ).

तैसें निंदे आणि स्तुती । मानु करूनि एके पांती ।
विचरे प्राणवृत्ती । जनीं वनीं ॥२०८॥

**अन्वय**--तैसें निंदे आणि स्तुती एके पांती मानु करूनि ( जो ) जनीं[1] वनीं प्राणवृत्ती विचरे[3].

**अर्थ**--त्याप्रमाणें निंदेचा आणि स्तुतीचा एकाच पंक्तींत ( म्ह० वर्गांत ) समावेश करून, ( जो ) लोकवस्तींत[1] ( व ) ( निर्जन ) अरण्यांत वायूच्या[2] वृत्तीनें[2] ( म्ह० उदास वृत्तीनें ) संचार[3] करतो[3].

साच लटिकें दोन्ही । बोलोनि न बोले जाहला मौनी ।
जे भोगितां उन्मनी । आरायेना ॥२०९॥

**अन्वय**--( जो ) साच लटिकें दोन्ही बोलोनि न बोले, मौनी जाहला, जे उन्मनी भोगितां आरायेना[1].

**अर्थ**--( जो ) खरें ( व ) खोटें दोन्ही बोलूनही ( तो कांहींच ) बोलत नाहीं, ( व म्हणून तो ) मौनी ( म्ह० अनालापी ) ठरतो, कारण ( तो ) उन्मनी ( अवस्था ) भोगतांना तृप्त[1] होत[1] नाहीं[1] ( म्ह० तो सतत उन्मनी अवस्थेंत असतो ).

जो यथालाभें न तोखे । अलाभें न पारुखे ।
पाउसेंवीण न सुके । समुद्रु जैसा ॥२१०॥

**अन्वय**--जो यथालाभें[1] न[2] तोखे[2]; ( आणि ) जैसा पाउसेंवीण समुद्रु न सुके ( तैसा ) अलाभें न[3] पारुखे[3].

**अर्थ**--जो पाहिजे[1] तितका[1] ( म्ह० इच्छेप्रमाणें ) लाभ[1] झाला[1]

असतांहि[1] संतुष्ट[2] होत[2] नाहीं[2]; ( आणि ) ज्याप्रमाणें पावसावांचून ( म्ह० पाऊस न पडला तरी ) समुद्र सुकत नाहीं ( त्याप्रमाणें ) ( जो ) अलाभानें ( म्ह० मिळालें नाहीं म्हणूनहि ) खिन्न[3] होत[3] नाहीं[3].

आणि वायूसि एके ठायीं । बिढार जैसें नाहीं ।
तैसा न धरीच कहीं । आश्रयो जो ॥२११॥

**अन्वय**—आणि जैसें वायूसि एके ठायीं बिढार नाहीं, तैसा जो कहीं आश्रयो न धरीच.

**अर्थ**—आणि ज्याप्रमाणें वायूला एके ठिकाणीं वसतिस्थान नसतें, त्याप्रमाणें जो कोठेंहि आसरा करीतच नाहीं.

आघवांचि आकाशस्थिती । जेवीं वायूसि नित्य वसती ।
तेवीं जगचि विश्रांति- । स्थान जया ॥२१२॥

**अन्वय**—जेवीं आघवांचि आकाशस्थिती[1] वायूसि नित्य वसती (असे), तेवीं जगचि जया विश्रांति-स्थान.

**अर्थ**—ज्याप्रमाणें सर्व आकाशाच्या[1] पोकळींत[1] वायूची नित्य वसति ( असते ), त्याप्रमाणें जगच ज्याचें राहण्याचें ठिकाण ( होऊन राहतें ).

हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर ।
किंबहुना चराचर । आपण जाहला ॥२१३॥

**अन्वय**—हें विश्वचि माझें घर ऐसी जयाची मती स्थिर, किंबहुना[1] ( जो ) आपण चराचर[2] जाहला[3].

**अर्थ**—हें ( संपूर्ण ) जगच माझें घर ( आहे ) अशी ज्याची बुद्धि दृढ ( झालेली असते ), फार[1] काय[1] सांगावें[1], ( जो ) स्वतःच स्थावर-जंगमात्मक[2] जग[2] ( विचारदृष्ट्या ) झालेला[3] असतो[3].

मग याहीवरी पार्था । माझ्या भजनीं आस्था ।
तरी तयातें मी माथां । मुकुट करीं ॥२१४॥

**अन्वय**—पार्था, मग याहीवरी[1] माझ्या भजनीं आस्था ( असे ) तरी मी तयातें माथां मुकुट[2] करीं[2].

**अर्थ**—अर्जुना, मग याच्याहि[1] वर[1] ( म्ह० इतकें असूनहि शिवाय ) ( जर त्याला ) माझ्या भजनामध्यें ( भक्तीमध्यें ) प्रेम ( असेल ) तर मी

त्याला ( माझ्या ) मस्तकावर मुकुट[२] करतों[२] ( म्ह० मुगुटाप्रमाणें मी त्याला सर्वश्रेष्ठ मानतों ).

उत्तमासि मस्तक । खालविजे हें काय कौतुक ।
परि मानु करिती तिन्ही लोक । पायवणिया ॥२१५॥

अन्वय--उत्तमासि[१] मस्तक खालविजे[२] हें काय कौतुक ( असे ), परि पायवणिया तिन्ही लोक मानु करिती.

अर्थ--चांगल्या[१] व्यक्तीपुढें[१] ( अर्थात् श्रेष्ठापुढें ) मान लवविली[२] जाते[२] ( अर्थात् वांकवावी ) हें ( ह्यांत ) काय आश्चर्य ( आहे ? ), कारण ( उत्तम व्यक्तीच्या ) चरणतीर्थाला ( म्ह० पायाच्या पाण्याला ) ( सुद्धां ) तिन्ही ( भुवनांतील ) लोक मान देतात ( म्ह० वंदितात अर्थात् पवित्र मानतात ).

तरि श्रद्धावस्तूसि आदरु--। करिता जाणिजे प्रकारु ।
जरी होय श्रीगुरु । सदाशिवु ॥२१६॥

अन्वय--जरी सदाशिवु श्रीगुरु होय तरि श्रद्धावस्तूसि[१] आदरु करिता प्रकारु जाणिजे[२].

अर्थ--जर श्रीशंकर गुरु होतील तरच श्रद्धेय[१] वस्तूचा[१] [ म्ह० आपल्या श्रद्धेचा ( भक्तीचा ) विषय[१] असलेल्या[१] व्यक्तीचा[१] ] आदर ( व्यक्त ) करण्याची रीत कळून[२] येईल[२] ( शब्दशः --कळण्यांत येतो ).

परि हें असो आतां । महेशातें वानितां ।
आत्मस्तुति होतां । संचारु असे ॥ २१७ ॥

अन्वय--परि हें आतां असो[१], महेशातें वानितां[२] आत्मस्तुति[३] होतां संचारु असे.

अर्थ--परंतु हें आतां राहूं[१] दे[१]; ( कारण ) श्रीशंकराचें वर्णन[२] करीत[२] असतांना[२] माझी[३] स्वतःची[३] स्तुति[३] होण्याचा दोष ( उत्पन्न ) होतो.

ययालागीं हें नोहे । म्हणितलें रमानाहें ।
अर्जुना मी वाहें । शिरीं तयातें॥ २१८ ॥

अन्वय--ययालागीं हें नोहे रमानाहें म्हणितलें, अर्जुना मी तयातें शिरीं वाहें[१].

**अर्थ**—या कारणास्तव हें ( योग्य ) नाहीं ( असें ) रमापतीनें ( अर्थात् श्रीकृष्णानें ) म्हटलें, " अर्जुना, मी त्याला डोक्यावर धारण करितों[१]."

जे पुरुषार्थसिद्धि चौथी । घेऊनि आपुलिया हातीं ।
रिगाला भक्तिपंथीं । जगा देतु ॥ २१९ ॥

**अन्वय**--जे चौथी पुरुषार्थसिद्धि[१] आपुलिया हातीं घेऊनि जगा भक्तिपंथीं देतु रिगाला[२].

**अर्थ**--कारण ( तो भक्त ) चवथ्या पुरुषार्थांची[१] पूर्णता[१] ( म्ह० मोक्ष ) आपल्या हातांत घेऊन ( तो मोक्ष ) जगाला भक्तिमार्गानें वांटीत जात[२] असतो[२] ( शब्दशः —वांटीत निघाला ).

कैवल्याचा अधिकारी । मोक्षाची सोडीबांधी करी ।
कीं जळाचिये परी । तळवटु घे ॥ २२० ॥

**अन्वय**--कैवल्याचा अधिकारी, मोक्षाची सोडीबांधी करी, कीं जळाचिये[१] परी[१] तळवटु घे.

**अर्थ**--( तो ) मोक्षाचा अधिकारी ( आहे ) ( अर्थात् मोक्षाचा नियामक असल्यामुळें ) मोक्षाची सोड–बांध ( अर्थात् मोक्ष देणें, न देणें ) ( हें आपल्या इच्छेप्रमाणें तो ) करतो; तरीपण पाण्याप्रमाणें[१] ( म्ह० पाण्याची रीत अनुसरून ) अधोभाग ( अर्थात् खालची जागा ) स्वीकारतो ( म्ह० नम्रता घेतो अर्थात् नम्रपणानें वागतो ).

म्हणोनि गा नमस्कारूं । तयातें आम्ही माथां मुकुट करूं ।
तयाची टांच धरूं । हृदयीं आम्ही ॥ २२१ ॥

**अन्वय**--गा ( अर्जुना ) म्हणोनि आम्ही तयातें नमस्कारू[१] ( तयातें ) माथां मुकुट[२] करूं[२]; तयाची टांच[३] आम्ही हृदयीं धरूं[३].

**अर्थ**--अरे ( अर्जुना ) म्हणून आम्ही त्याला नमस्कार[१] करूं[१] ( अथवा करतों ), ( त्याला ) डोक्यावर मुगुटासारखा धारण[२] करूं[२] ( अथवा करतों ), ( आणि ) त्याच्या पायाचें[३] चिन्ह[३] आम्ही हृदयावर धारण[४] करूं[४] ( अथवा करतों ).

तयाचिया गुणांचीं लेणीं । लेववूं आपुलिये वाणी ।
तयाची कीर्ति श्रवणीं । आम्ही लेऊं ॥ २२२ ॥

**अन्वय**—तयाचिया गुणांचीं लेणीं आपुलिये वाणी लेववूं ( आणि ) आम्ही तयाची कीर्ति श्रवणीं लेऊं.

**अर्थ**—त्याच्या गुणांचे दागिने आमच्या वाचेला घालूं ( आणि ) आम्ही त्याची कीर्ति ( हा दागिना ) कानांत घालूं.

तो पहावा हे डोहळे । म्हणोनि अचक्षूसी मज डोळे ।
हातींचेनि लीलाकमळें । पुजूं तयातें ॥ २२३ ॥

**अन्वय**—तो पहावा हे डोहळे म्हणोनि अचक्षूसी मज डोळे ( असती ), हातींचेनि लीलाकमळें[1] तयातें पुजूं[2].

**अर्थ**— तो पाहावा ही इच्छा असल्यामुळें नेत्रहीनाला मला ( हे ) डोळे ( आहेत ), ( व ) हातांत विलासाकरितां[1] घेतलेल्या[1] कमळानें[1] (मी) त्याची पूजा[2] करतों[2].

दोंवरी दोनी । भुजा आलों घेउनी ।
आलिंगावयालागुनी । तयाचें आंग ॥ २२४ ॥

**अन्वय**—तयाचें आंग आलिंगावयालागुनी[1] दोंवरी दोनी भुजा घेउनी आलों.

**अर्थ**—त्याच्या शरीराला आलिंगन[1] देण्याकरितांच[1] दोहोंवर (आणखी) दोन बाहू घेऊन ( मी ) अवतरलों ( आहें ).

तया संगाचेनि सुरवाडें । मज विदेहा देह धरणें घडे ।
किंबहुना आवडे । निरुपमु ॥ २२५ ॥

**अन्वय**—विदेहा मज तया संगाचेनि सुरवाडें देह धरणें[1] घडे; किंबहुना[2] ( तो ) निरुपमु आवडे.

**अर्थ**—देहरहिताला मला त्याच्या संगतीच्या सुखासाठीं शरीर धारण[1] करावें[1] लागतें; फार[2] काय[2] सांगावें[2] ( तो मला ) अद्वितीय वाटतो.

तेणेंसीं आम्हां मैत्र । एथ कायसें विचित्र ।
परि तयाचें चरित्र । ऐकती जे ॥ २२६ ॥

**अन्वय**—आम्हां तेणेंसीं मैत्र, एथ कायसें विचित्र परि जे तयाचें चरित्र ऐकती—

**अर्थ**—आमची त्याच्याशीं मैत्री ( असते ) यांत कसलें आश्चर्य ! पण जे त्याचें चरित्र ऐकतात ( ते )—

तेही प्राणापरौते । आवडती हें निरुतें ।
जे भक्तचरित्रातें । प्रशंसिती ॥ २२७ ॥

**अन्वय**—जे भक्तचरित्रातें प्रशंसिती[1], तेही प्राणापरौते आवडती, हें निरुतें ( असे ).

**अर्थ**—( व ) जे भक्तचरित्राचें वर्णन[1] करतात[1], तेसुद्धां ( मला ) प्राणापलीकडे आवडतात, हें निश्चित ( आहे ).

जो हा अर्जुना साद्यंत । सांगितला प्रस्तुत ।
भक्तियोगु समस्त । योगरूप ॥ २२८ ॥

**अन्वय**—अर्जुना, जो हा प्रस्तुत साद्यंत[1] भक्तियोगु सांगितला, ( तो ) समस्त योगरूप ( असे ).

**अर्थ**—अर्जुना, जो हा आतां ( आरंभापासून[1] शेवटपर्यंत[1] म्हणजे ) संपूर्ण भाक्तियोग सांगितला, ( तो ) सर्व योगस्वरूप ( आहे ) ( म्ह० त्यांत सर्व योगाचा अंतर्भाव होतो ).

जेणें मी प्रीति करीं । कां मनीं शिरसा धरीं ।
येवढी थोरी । जया स्थिती ये ॥ २२९ ॥

**अन्वय**—जेणें मी प्रीति करीं, कां मनीं शिरसा धरीं[1], येवढी थोरी जया स्थिती ये[2].

**अर्थ**—ज्यामुळें ( म्ह० ज्या भाक्तियोगामुळें ) मी ( भक्तावर ) प्रीति करतों, आणि मनांत ( व ) मस्तकावर धारण[1] करतों[1], एवढी महती ( त्या भक्ताला ) ज्याच्या ( म्ह० भाक्तियोगाच्या ) आश्रयानें प्राप्त[2] होते[2].

**ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।**
**श्रद्दधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः॥२०॥**

ते हे गोठी रम्य । अमृतधारा धर्म्य ।
करिती प्रतीतिगम्य । आइकोनि जे ॥२३०॥

**अन्वय**—जे ते हे रम्य अमृतधारा[1] धर्म्य गोठी आइकोनि प्रतीतिगम्य[2] करिती.

**अर्थ**—जे ( कोणी लोक ) ती ही आनंददायक, अमृताच्या[1] धारेसारखी[1] ( मधुर ), धर्मानुकूल गोष्ट ऐकून ( आपल्या ) अनुभवाचा[2]

विषय[२] करतात ( म्ह० त्याचा अनुभव घेतात ).

परि निरूपिली जैसी । तैसीच स्थिति मानसीं ।
मग सुक्षेत्रीं जैसी । पेरणी केली ॥२३१॥

**अन्वय**--परि ( मीं ) जैसी निरूपिली, तैसीच मानसीं स्थिति (आथि), मग जैसी सुक्षेत्रीं[१] पेरणी केली.

**अर्थ**--आणि ( मीं ) ज्याप्रमाणें सांगितली, तशीच मनांत स्थिति ( असेल ), ( तर ) मग ज्याप्रमाणें उत्तम[१] शेतांत[१] पेरणी केली ( म्हणजे बीं समृद्ध होतें );

तैसीचि श्रद्धेचेनि आदरें । जयाचे ठायीं विस्तरे ।
जीवीं जया थारे । जे अनुष्ठिती ॥ २३२ ॥

**अन्वय**—तैसीचि श्रद्धेचेनि आदरें जयाचे ठायीं विस्तरे, जया जीवीं थारे[१] ( आणि ) जे अनुष्ठिती[२].

**अर्थ**--त्याचप्रमाणें श्रद्धेच्या स्वीकारानें ( ही गोष्ट ) ज्याच्या ठिकाणीं वाढते ( म्ह० बळावते ), ज्याच्या मनांत स्थिर[१] राहते[१], ( व मग ) जे ( ती ) आचरणांत[२] आणतात[२].

परि मातें परम करूनि । इये अर्थीं प्रेम धरूनि ।
हेंचि सर्वस्व मानूनि । घेती जे पैं ॥ २३३ ॥

**अन्वय**--परि जे मातें परम करूनि, इये अर्थीं प्रेम धरूनि, हेंचि सर्वस्व[१] मानूनि घेतीं.

**अर्थ**--आणि जे मला श्रेष्ठ ( अर्थात् अंतिम प्राप्य ) समजून, (आणि) या गोष्टीबद्दल ( म्ह० भक्तियोगाबद्दल ) आवड धरून ( आणि ) हीच ( गोष्ट ) ( आपलें ) सर्व[१] भांडवल[१] समजून आंगिकारतात.

पार्था गा जगीं । तेचि भक्त तेचि योगी ।
उत्कंठा तयांलागीं । अखंड मज ॥ २३४ ॥

**अन्वय**--गा पार्था, जगीं तेचि भक्त तेचि योगी ( आथी ), मज तयांलागीं अखंड उत्कंठा ( असे ).

**अर्थ**--अरे अर्जुना, जगतांत तेच भक्त ( व ) तेच योगी ( आहेत ), मला ( म्ह० माझ्या ठिकाणीं ) त्यांच्याविषयी निरंतर उत्सुकता ( असते ).

ते तीर्थ ते क्षेत्र । जगीं तेंचि पवित्र ।
भक्तिकथेसीं मैत्र । जयां पुरुषां ॥ २३५ ॥

**अन्वय**--जयां पुरुषां भक्तिकथेसी मैत्र ( असे ), तेंचि जगीं पवित्र, ते तीर्थ, ते क्षेत्र.

**अर्थ**--ज्या पुरुषांना भक्तिकथेची आवड ( असते ), तेच ( या ) जगतांत पवित्र ( आहेत ), ( व ) ते तीर्थ ( आहेत ) ( आणि ) ते क्षेत्र ( म्ह० पुण्यस्थान ) ( आहेत ).

आम्ही तयांचें करूं ध्यान । ते आमुचें देवतार्चन ।
तेवांचूनि आन । गोमटें नाहीं ॥ २३६ ॥

**अन्वय**--आम्ही तयांचें ध्यान करूं; ते आमुचें देवतार्चन[1] ( असे ) तेवांचूनि आन गोमटें नाहीं.

**अर्थ**--आम्ही त्यांचें ध्यान करूं; ते आमचें पुजेचें[1] दैवत[1] ( होत ); त्यांच्यावांचून दुसरें ( जगतांत ) प्रिय ( आम्हांला ) नाहीं.

तयाचें आम्हां व्यसन । तो आमुचें निधिनिधान ।
किंबहुना समाधान । तो मिळे तैं ॥ २३७ ॥

**अन्वय**--आम्हां तयाचें व्यसन, तो आमुचें निधिनिधान[1], किंबहुना[2] तो मिळे तैं समाधान ( असे ).

**अर्थ**--आम्हांला त्याचा छंद ( असतो ), तो आमच्या भांडारांतील[1] मूल्यवान[1] ठेवा[1] ( आहे ), फार[2] काय[2] सांगावें[2]; तो भेटतो तेव्हांच ( आमच्या मनाला ) समाधान ( वाटतें ).

पैं प्रेमळाची वार्ता । जे अनुवादती पांडुसुता ।
ते मानूं परमदेवता । आपुली आम्ही ॥ २३८ ॥

**अन्वय**--पांडुसुता, जे प्रेमळाची[1] वार्ता अनुवादती, ते आम्ही आपुली परम देवता मानूं.

**अर्थ**--अर्जुना, जे प्रेमळ[1] भक्ताची[1] कथा सांगतात, त्यांना आम्ही आमचें श्रेष्ठ दैवत मानतों.

ऐसें निजजनानंदें । तेणें जगदादिकंदें ।
बोलिलें मुकुंदें । संजयो म्हणे ॥ २३९ ॥

**अन्वय**–ऐसें तेणें निजजनानंदें[1], जगदादिकंदें[2], मुकुंदें बोलिलें, संजयो म्हणे.

**अर्थ**––असें त्या आपल्या[1] भक्तांचा[1] आनंद[1], जगाचें[2] मूळ[2] कारण[2] ( असलेल्या ), श्रीकृष्णानें सांगितलें, ( असें ) संजय म्हणाला.

राया जो निर्मळु । निष्कल लोककृपाळु ।
शरणागतां प्रतिपाळु । शरण्यु जो ॥ २४० ॥

**अन्वय**––राया जो निर्मळु, निष्कल, लोककृपाळु[1] शरणागतां[2] प्रतिपाळु[2], जो शरण्यु[3] ( असे ).

**अर्थ**––राजा ( धृतराष्ट्रा ) जो शुद्ध, ( सर्व संपत्तीनें ) परिपूर्ण, लोकांवर[1] कृपा[1] करणारा[1] ( आणि ) शरण[2] आलेल्यांचा[2] रक्षण[2] करणारा[2] ( व म्हणून ) जो शरण[3] जाण्यास[3] योग्य[4] ( असा आहे ).

जो धर्मकीर्तिधवळु । अगाधदातृत्वें सरळु ।
अतुळबळें प्रबळु । बळिबंधनु ॥ २४१ ॥

**अन्वय**-जो धर्मकीर्तिधवळु[1] अगाधदातृत्वें सरळु अतुळबळें प्रबळु[2] बळिबंधनु.

**अर्थ**––जो धर्मविषयक[1] उज्ज्वल[1] कीर्तीनें[1] शुभ्र[1] ( आहे ), अपार औदार्यामुळें वैषम्यरहित ( आहे, अर्थात् नित्य दान देण्यास सिद्ध आहे ) (व) अद्वितीय सामर्थ्यामुळें अत्यंत[2] बलिष्ठ[2] बळीला ( पाताळांत ) बांधणारा–

पैं सुरसहायशीळु । लोकलालनलीळु ।
प्रणतप्रातिपाळु । हा खेळु जयाचा ॥ २४२ ॥

**अन्वय**––सुरसहायशीळु[1]; लोकलालनलीळु[2]; प्रणतप्रातिपाळु[3] हा जयाचा खेळु ( असे ).

**अर्थ**––देवांना साहाय्य[1] करणें हा ज्याचा स्वभाव आहे; लोकांचें प्रेमानें रक्षण[2] करणें हा ज्याचा विलास आहे; ( आणि ) शरणागतांचें[3] रक्षण[3] करणें[3], हा ज्याचा खेळ ( आहे ).

जो भक्तजनवत्सलु । प्रेमळजनप्रांजळु ।
सत्यसेतुसरळु । कलानिधि ॥ २४३ ॥

**अन्वय**–जो भक्तजनवत्सलु[1] प्रेमळजनप्रांजळु[2] सत्यसेतुसरळु[3] कलानिधि[4].

**अर्थ**––जो भक्तजनांचा[1] कनवाळू[1], प्रेम[2] करणाऱ्या[2] लोकांशीं[2] ऋजु[2] असणारा[2], सत्याची[3] मर्यादा[3] पालन[3] करणारा[3], ( व ) ( सकळ ) कलांचा[4] ठेवा[4] ( आहे ).

तो श्रीकृष्ण वैकुंठींचा । चक्रवर्ती निजांचा ।
सांगे येरु दैवाचा । आइकतु असे ।। २४४ ।।

**अन्वय**—तो निजांचा चक्रवर्ती ( व ) वैकुंठींचा श्रीकृष्ण सांगे[१], दैवाचा येरु आइकतु असे.

**अर्थ**—तो स्वकीयांचा ( म्ह० भक्तांचा ) सम्राट् ( सर्वश्रेष्ठ ) ( व ) वैकुंठांतील ( म्ह० वैकुंठांत असणारा ) श्रीकृष्ण सांगत[१] आहे[१]. ( व ) भाग्यवान् दुसरा ( म्ह० अर्जुन ) ऐकत आहे.

आतां ययावरी । निरूपिती परी ।
संजयो म्हणे अवधारीं । धृतराष्ट्रातें ।। २४५ ।।

**अन्वय**—आतां ययावरी निरूपिती[१] परी अवधारीं ( ऐसें ) संजयो धृतराष्ट्रातें म्हणे.

**अर्थ**—आतां यानंतर ( भगवंताचा ) विवेचन[१] करण्याचा[१] प्रकार ऐक ( म्ह० तिकडे लक्ष दे ), ( असें ) संजय धृतराष्ट्राला म्हणाला.

तेचि रसाळ कथा । मऱ्हाठिया प्रति पथा ।
आणिजेल आतां । अवधारिजो ।। २४६ ।।

**अन्वय**—तेचि रसाळ कथा, मऱ्हाठिया[१] पथा[२] प्रति[२] आणिजेल[३], आतां अवधारिजो[४].

**अर्थ**—तीच रसभरित कथा, मऱ्हाठी[१] भाषेच्या[१] मार्गाला[२] ( अर्थात् रूपांत ) आणली[३] जाईल[३], आतां ( तिकडे ) लक्ष[४] द्यावें[४].

ज्ञानदेव म्हणे तुम्ही । संत वोळगावेति आम्ही ।
हें पढविलां जी स्वामी । निवृत्तिदेवीं ।। २४७ ।।

**अन्वय**—ज्ञानदेव म्हणे, जी आम्ही तुम्ही संत वोळगावेति[१], हें स्वामी निवृत्तिदेवीं पढविलां[२].

**अर्थ**—ज्ञानेश्वरमहाराज म्हणतात, ' महाराज, आम्हीं तुम्हां संतांची सेवा[१] करावी[१], हें श्रीगुरु निवृत्तिदेवांनीं ( आम्हांस ) शिकविलें[२] आहे[२].

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां द्वादशोऽध्यायः ।।१२।।

याप्रमाणें श्रीज्ञानदेवांनीं केलेल्या भावार्थदीपिकेंतील बारावा अध्याय समाप्त झाला. [ श्लोक २०, ओव्या २४७ ].

।। श्रीकृष्णार्पणमस्तु ।।

